






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष ७ : अंक २ : उन्हाळा १९८९





अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** अशोक रा. केळकर (प्रमुख), आशा मुंडले, कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ५२००९)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ५२००९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी विजया देव / मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

# भाषेचे प्रेम आणि भाषेचा द्वेष

**भाषा आणि जीवन** याचे पहिले संपादकीय ( १:१ जुलै १९८३ ) लिहिताना असे म्हटले होते, की भाषेची अभ्यासक जोपर्यंत तिच्यावर प्रेम करीत नाही, तोपर्यंत ती त्याच्या अधीन होत नाही, आपले सगळे गुपित त्याला सांगत नाही. भाषेवरच्या प्रेमाचा आणखीही एक नियम दिसतो. पहिल्या जागतिक मराठी परिषदेच्या अध्यक्षपदावरून श्री. वि. वा. शिरवाडकर म्हणाले, ( ११ ऑगस्ट, १९८९ ), की जो स्वतःच्या भाषेवर प्रेम करतो, तोच दुसऱ्याच्या भाषेवर प्रेम करू शकतो. स्वतःचे उदाहरण देऊन ते म्हणाले, की मराठी भाषेवर माझे प्रेम आहे, तसेच इंग्रजी भाषेवर मी मनापासून प्रेम करतो.

आता जे लोक इंग्रजी भाषेवर फिदा झालेले दिसतात, पण स्वतःच्या मराठी भाषेची कदर करीत नाहीत, तिला नोकराचाकरांशी नाही तर म्हाताऱ्या आईशी बोलायची बोली समजतात, त्यांचे काय ? शिरवाडकर-नियमाला हा अपवाद समजायचा, की काय ? बारकाईने पाहिल्यास तसे दिसत नाही. शिरवाडकरांनी इंग्रजी भाषेवर मनापासून प्रेम केल्याची साक्ष त्यांनी अनुवादिलेली ( आणि स्वतंत्र लिहिलेली सुद्धा ) नाटकेच देतील. इंग्रजी भाषेमधले साहित्यधन आणि विचारधन त्यांनी लुटलेले आहे आणि लुटवलेलेही आहे. मशारनिल्हे इंग्रजीवर फिदा झालेल्या मंडळींच्या भाषाप्रेमाची साक्ष कोणती ? त्यांनी ' स्लिक टॉक ' करून पार पाडलेले ' डील्स ', का प्रवासात वेळ घालण्यासाठी चुंफून फेकून दिलेल्या ' सेक्स अँड व्हायोलन्स ' मसाल्याच्या ' बेस्ट् सेलर ' कादंबऱ्या ? इंग्रजीचा सोस म्हणजे इंग्रजीचे प्रेम नव्हे. काहींच्या बाबतीत हा सोस मतलबी असतो. भाषा हे त्यांच्या लेखी विचार लपवण्याचे, फार तर शेरेबाजी करून विचारांचा अभाव लपवण्याचे साधन असते. ( ज्यांची स्वभाषा इंग्रजी आहे, अशांतही भाषेवर प्रेम नसलेले, भाषेला केवळ साधन समजणारे लोक मला भेटलेले आहेत. मी उद्धृत केलेल्या ओळी कीट्सच्या आहेत, असे माझ्याकडून ऐकल्यावर ' व्हॉट आर कीट्स ? ' असा निरागस प्रश्न विचारणारे मला इंग्लंड-अमेरिकेत भेटलेले आहेत. ) उलट, काही भारतीयांच्या बाबतीत हा इंग्रजीचा सोस भोळसट असतो. आपले इंग्रजी कमी पडले, आपल्याला इंग्रजी आले नाही, तर आपण शर्यतीत मागे पडू, आपल्याला सामाजिक प्रतिष्ठा लाभणार नाही आपल्या विचारांना वजन लाभणार नाही, असे त्यांना वाटते. ( असे लोक मराठीत बोलताना जरूर नाही, तिथे इंग्रजी शब्द तर घुसडतातच, पण मराठीत म्हटलेले महत्त्वाचे वाक्य पुन्हा इंग्रजीत अनुवाद करून सांगतात. )

तर मग इंग्रजीला शिव्या देणारे, ' अंग्रेजी हटाओ ' म्हणून आक्रस्ताळीपणा करणारे,




अनुक्रमणिका

इंग्रजीचा द्वेष करणारांचे काय ? खरी स्थिती अशी आहे की इंग्रजीचा भोळा सोस काय आणि इंग्रजीचा आंधळा द्वेष काय-दोन्ही एकाच न्यूनभावाचे दोन सारखेच केविलवाणे आविष्कार आहेत. इंग्रजीचा त्याग केल्याशिवाय मराठी सुप्रतिष्ठित होईल याची त्यांची त्यांनाच खातरी नसते.

कधी वाटते की आज मराठी भाषेची आज जी स्थिती आहे ती तशी प्राप्त होण्यामध्ये या इंग्रजी-द्वेष्ट्या मराठीच्या पक्षपाती लोकांचाही तोंडभार लागलेला आहे. त्यांच्या मूर्ख इंग्रजी-द्वेषाची तितकीच एकांगी प्रतिक्रिया काही जणात उमटली. मराठीला अशा ‘ मित्रां ’-पासून वाचवा असेच म्हणायला पाहिजे ! (कुणी दिला बरे आपल्याला हा वाक्प्रचार मित्रांपासून वाचवण्याचा ? इंग्लंडचा एकोणिसाव्या शतकातला मुख्यमंत्री आणि व्यंगकवी जॉर्ज कॅनिंग !) निराळ्या शब्दांत सांगायचे तर मराठीचा पक्षपात म्हणजे मराठीवरचे प्रेम नव्हे.

कदाचित् शिरवाडकरांना असे तर सुचवायचे नसेल ना की स्वभाषेवर प्रेम करणे म्हणजे भाषेवर प्रेम करणे ?

**अशोक रा. केळकर**

**कानी पडलेला संवाद**

१९५०-६५ च्या सुमाराला मी संघीय लोकसेवा आयोगाचा तंत्रविद्याविशेषज्ञ म्हणून सभासद होतो, त्या वेळची गोष्ट. एक उच्चस्तरीय तुर्कस्तानी शिष्टमंडळ दिल्लीला आलेले होते आणि भारतीय तंत्रविद्या संस्थांमधून (आय्. आय्. टी.) १०० तुर्की विद्यार्थ्यांना प्रवेश मिळावा, या खटपटीत ते होते. मंडळाच्या म्होरक्याला मी म्हटले, ‘ तुम्ही लोक इतके वर्षे स्वातंत्र्य उपभोगत आहात. असे असून तुम्हांला आपल्या एंजिनियरांचे प्रशिक्षण भारतामध्ये करवायची वेळ का बरे आली ? ’ तो म्हणाला, ‘ तुमची शंका बरोबर आहे. आमची एक घोडचूक झाली– आम्ही देशातले सर्वच व्यवहार तुर्की भाषेच्या माध्यमात करण्याचा निर्णय घेतला. विविध व्यावसायिकी क्षेत्रांत सतत येणाऱ्या प्रगत ज्ञानाशी आम्ही बरोबरी राखू शकलो नाही. एक तर भाषांतर– प्रक्रिया फार महाग पडते. प्राध्यापक मंडळींनी स्वतंत्रपणे लिहिलेल्या पुस्तकांना फक्त देशातले वाचक लाभले. नवे विचार, नवे शोध सहजपणे ना देशात येऊ शकले, ना देशाबाहेर जाऊ शकले. आमच्या व्यावसायिकांना इंग्रजी भाषेचे शिक्षण द्यायचा निर्णय आम्ही आता घेतला आहे. ’

**पी. एल्. वर्मा, द ट्रिब्यून (चंदीगढ) १९८८.०४.२५, पृ. ४.**





अनुक्रमणिका

# चित्रपट, नाट्यकला आणि दूरचित्रवाणी

अनिल झणकर

लेखांक ४ मध्ये ( चित्रपट आणि नाट्यकला : दोन कलामाध्यमे, **भाषा आणि जीवन**, हिवाळा १९८९ ) माध्यम या कल्पनेचा विचार करताना म्हटलं होतं, की दोन गोष्टींच्या-मधलं पद किंवा संज्ञापनकार्याचं साधन किंवा संवाहक म्हणजे माध्यम. त्या अनुषंगाने आपण नाट्यकला आणि चित्रपटकला यांचा संज्ञापनमाध्यम (लेखांक ३, दिवाळी १९८८) तसंच कलामाध्यम या दोनही अंगांनी विचार करून पाहिला. एखाद्या माध्यमाचा आपण संज्ञापनमाध्यम म्हणून विचार करतो, तेव्हा, त्या माध्यमाद्वारे होणाऱ्या संज्ञापनाची रचना आणि प्रक्रिया यांची चर्चा करतो, तर कलामाध्यम म्हणून एखाद्या माध्यमाचा विचार करताना, आपण त्या माध्यमाचे मूलभूत घटक, त्यांची एकमेकांशी असलेली नाती, आणि त्यांच्या रचनेतून प्रकट होणारी त्या माध्यमाची अभिव्यक्ती यांवर लक्ष केंद्रित करतो. याच संदर्भात आपल्याला दूरचित्रवाणीचा विचार करायचाय्. कारण आजकालच्या जगात नाट्य, चित्रपट, आणि दूरचित्रवाणी एकमेकांशी स्पर्धा तसंच देवाणघेवाणही करताना दिसतात.

दूरचित्रवाणीबाबत बोलताना अनेकदा ते व्यापक प्रसार किंवा बहुजनसंपर्की माध्यम (मॅस मीडियम) असल्याचा हटकून उल्लेख होतो. कधी नभोवाणी आणि चित्रवाणीफीत ( व्हिडियोटेप ) यांच्या जोडीला दूरचित्रवाणीला इलेक्ट्रॉनिक मीडियम या वर्गात घालतात. पण सहसा, कलामाध्यम म्हणून कुणी दूरचित्रवाणीकडे पाहत नाही. समाजाच्या शैक्षणिक सर्वांगीण उन्नतीचं एक महत्त्वाचं साधन वगैरे म्हणून काही लोक दूरचित्रवाणीकडे पाहतात, तर काहीजण समाजातील एकंदर वेळखाऊ बाष्कळपणाला खतपाणी घालणारा प्रकार म्हणून त्याला मोडीत काढतात. तेव्हा यातली कुठलीही टोकाची भूमिका टाळून या सर्व गोष्टींचे नीटपणे परिप्रेक्षण करायचे असेल, तर दूरचित्रवाणीचा उगम आणि विकास यांच्याशी निगडित असलेल्या तांत्रिक, वैज्ञानिक, आर्थिक आणि सामाजिक गोष्टींची माहिती करून घेणं हे ओघानंच आलं.

## १

जे. एल्. बेअर्ड या ब्रिटिश माणसाकडे दूरचित्रवाणीच्या शोधाचं श्रेय जातं. पण १९२६ साली त्याने निर्मिलेली दूरचित्रवाणी ही आजच्यासारखी रंगीत स्वरूपात किंवा प्रसारणक्षम नव्हती, तर दृश्य आणि ध्वनी यांचं रूपांतर इलेक्ट्रॉनिक माध्यमातल्या संदेशां-मधे ( signals ) करता येतं, हे त्यानं यशस्वीपणे दाखवून दिलं. त्याने दाखवलेल्या दिशेने




अनुक्रमणिका

प्रगती होत होत बीबीसीने १९३६ साली दूरचित्रवाणीच्या प्रसारणास सुरुवात केली. हे प्रसारण कृष्णधवल छटांमध्ये होतं. १९३९ साली अमेरिकेत राष्ट्राध्यक्ष रोझवेल्ट यांचा संदेश दूरचित्रवाणीवर अनेक ठिकाणी प्रथम दाखवण्यात आला आणि १९४० सालापासून तिथे प्रसारणयंत्रणेचं जाळं उभारून ' नेटवर्क ट्रान्समिशन 'ला सुरुवात झाली. त्याचबरोबर प्रायोगिक स्वरूपात रंगीत दूरचित्रवाणी पण अस्तित्वात आली. १९६० सालानंतर दूरचित्रवाणीने रंगांच्या आणि उपग्रह-दळणवळणाच्या युगात प्रवेश केला. आता खास दूरचित्रवाणीकरता अवकाशात सोडलेल्या उपग्रहांद्वारे एक कार्यक्रम, अनेक देशांमध्ये, एकाच वेळी दाखवण्याची सोय झाली. अशा तऱ्हेने प्रसारणक्षमतेच्या तसंच तांत्रिक दर्जाच्या बाबतीत एवढा मोठा पल्ला गाठल्यावर पुढल्या दशकात म्हणजे १९७० सालानंतर घरगुती किंवा अव्यावसायिक पातळीवर वापरायची अर्ध्या इंचाची चित्रवाणीफीत (व्हिडिओटेप) ( VHS ), केबल टीव्ही ही तंत्रं विकसित झाली. त्यामुळे आता प्रसारणक्षम (Broadcast) आणि अप्रसारणक्षम ( Non Brodcast ) चित्रवाणी असं वर्गीकरण जन्माला आलं. अव्यावसायिक उपकरणांपैकी लग्न-मुंजी, सत्कार-समारंभ, डोहाळजेवणं इ.च्या चित्रीकरणाकरता वापरलं जाणारं VHS हे तंत्र आपल्या ओळखीचं आहेच. तुलनेने केबल टीव्ही मात्र आपल्याकडे अजून तेवढा प्रचलित नाही. केबल टीव्हीच्या तंत्रात दूरचित्रवाणीच्या संदेशाचे वहन हे रेडियो लहरींऐवजी धातूच्या तारेमार्फत केलं जातं. अव्यावसायिक उपयोगासाठी असलेल्या VHS व केबल टीव्हीमुळे लोकांच्या लहान-सहान गटांनी, आपापल्या गरजांपुरते व आपापल्या विभागात दाखवण्यापुरते कार्यक्रम ( विशेषतः शैक्षणिक किंवा सामाजिक अनुबोधनपर कार्यक्रम ) खाजगीरीत्या निर्माण करण्याचं दालन उघडलं गेलं, नवीन शक्यता जन्मास आल्या.

दूरचित्रवाणीच्या या गेल्या सुमारे पाच-एक दशकांच्या कालावधीतच इतर क्षेत्रांत झालेल्या स्टीरिओफोनिक ध्वनिमुद्रण, संगणक-निर्मिती व विकास यांसारख्या गोष्टींचे फायदेही दूरचित्रवाणीला मिळत गेले. किंबहुना असं म्हणायला पाहिजे, की दुसऱ्या महायुद्धाच्या काळात विकसित झालेली रेडार-यंत्रणा ( RADAR ), इलेक्ट्रॉनिक्स विशेषतः संगणकतंत्रज्ञान या क्षेत्रांमध्ये झालेल्या अभूतपूर्व प्रगतीमुळे अर्वाचीन जगात एक सर्वस्वी नवीन, आणि अतिव्यापक अशा संदेशवहन-तंत्राचं (Information Technology ) युग अवतरलं. दूरचित्रवाणी हा या व्यापक विश्वाचाच एक भाग आहे.

२

वरकरणी पाहता दूरचित्रवाणी, नाट्यकला, आणि चित्रपट ह्यांच्यांत काही साम्य दिसतं. उदा. दूरचित्रवाणी हेही चित्रपटाप्रमाणेच एक मुद्रणमाध्यम आहे. त्याच्यातून उगम पावणारी संवेदना ही चित्रपटाप्रमाणे दृक्-श्राव्य परिणामावर आधारित असते. नाटकाप्रमाणेच दूरचित्रवाणीत माणसाच्या उपस्थितीला, चलनवलनाला महत्त्व आहे. नाटकात अखंडपणे

आणि सदोदित जिवंत संज्ञापन होतं, तर दूरचित्रवाणीत निवेदन, बातम्या, खेळ-परिषदा यांचं 'थेट' प्रसारण अशा कार्यक्रमांच्या वेळीच फक्त तत्काल संज्ञापन घडत असतं. पण हे साधर्म्य इथेच संपतं. कारण जरा बारकाईने पाहू गेलं, तर या माध्यमांमधले फारकतीचे मुद्देच जास्ती जाणवतात.

(क) तांत्रिकता

नाट्यकला हे ध्वनी (भाषा), हावभाव (अभिनय), घन आकृतींची हालचाल अशासारख्या कुणाही माणसाच्या बऱ्याच अंशी अधीन साधनांवर अवलंबून असलेलं माध्यम आहे. त्यात तांत्रिकतेला दुय्यम स्थान आहे.

चित्रपट हे भौतिक विज्ञान, रसायन आणि जीवविज्ञान या ज्ञानशाखांमधल्या तंत्रांवर आणि सिद्धांतांवर सर्वस्वी अवलंबून असलेलं यंत्रजीवी माध्यम आहे.

दूरचित्रवाणी हे तर पूर्णतः इलेक्ट्रॉनिक तंत्रज्ञानावर आधारलेलं माध्यम आहे.

नाटकात मानवी शरीर आणि दृश्य जग ही नैसर्गिक यथार्थ दर्शनात (natural perspective) मध्ये दिसतात.

चित्रपटात दृश्य जग हे क्षणोक्षणी बदलत्या प्रतिमांच्या रूपाने साकार होते. तसंच पडद्यावरच्या ह्या प्रतिमांमध्ये दिसणाऱ्या मानवी शरीराचं व इतर वस्तूंचं आकारमान वास्तवापेक्षा कितीतरी पटींनी मोठं असतं. त्यामुळे वस्तूंचे, माणसाच्या देहाचे बारीकसारीक तपशीलही भव्य अशा आकारात, अधिक स्पष्टपणे पाहायला मिळतात.

दूरचित्रवाणीत कॅमेऱ्यापुढचं एकंदर जगच जणू संकोच पावतं. माणसाचं पूर्ण शरीर मोठमोठाली झाडं, एखाद्या पर्वताचा मोठा भाग यासारख्या लहानमोठ्या गोष्टी दूरचित्रवाणीच्या पडद्यावर सरसकट फार लहान होऊन प्रकटतात.

नाटकात जे काही घडतं ते डोळ्यापर्यंत थेट म्हणजे कुठल्याही यंत्राचा हस्तक्षेप न होता पोहोचतं.

चित्रपटातली दृश्यं आणि ध्वनी आपल्यापर्यंत पोहोचतात ते यंत्राची कार्यक्षमता आणि तंत्रज्ञ-कलाकारांचं तंत्रकौशल्य हा दोन गोष्टींच्या मिलाफाने. यंत्राची गुणवत्ता जितकी चांगली आणि ती वापरण्याचं कौशल्य जितकं सरस तितकाच तांत्रिक व सौंदर्यशास्त्रीय-दृष्ट्याही परिणाम सरस.

दूरचित्रवाणी आपल्यापर्यंत पोहोचण्याच्या प्रक्रियेत चित्रपटासारखीच एक तांत्रिकता असते; पण चित्रपटाच्या तुलनेत दूरचित्रवाणीची प्रतिमा ही फारच निकृष्ट असते. प्रकाश-योजना, रंगसंगती, प्रतिमाकार, कृष्णधवल छटा यांसारख्या गोष्टींचे बारकावे दूरचित्रवाणीत चित्रपटासारखे चांगल्या तऱ्हेने येत नाहीत, तितके परिणामकारक वाटत नाहीत.

(ख) संज्ञापन

नाट्यसंज्ञापन हे जिवंतपणे, सार्वजनिक ठिकाणी सादर होत असल्याने सामाजिक असतं. ते एकपक्षी नसतं. कारण त्यात साद–प्रतिसादाचं नातं अपेक्षित असतं; ह्या नात्याच्या प्रयोगाच्या गुणवत्तेवर परिणाम होऊ शकतो.

चित्रपटाचं संज्ञापन हे पडद्यावरच्या हलत्या-बोलत्या प्रतिमा आणि इतर ध्वनींद्वारे होतं. चित्रपट बघत असताना आपण बाह्य जगातील ध्वनी आणि दृश्यं यापासून पूर्णतः तोडलेले असतो. पडद्यावरच्या प्रतिमांचा भव्याकार ति त्यांनी निर्माण केलेला त्रिमितिबद्ध जगाचा आभास आणि वाढवून मोठा केलेला ध्वनी यांमुळे संज्ञापणाला एक तीव्रता, सखोल परिणामकारकता प्राप्त होते. चित्रपट चालू असताना हशा, टाळ्या, हुंदके, शिट्ट्या, ठेका धरणे असे प्रतिसाद प्रेक्षागृहात मिळतात; पण त्यांचा चित्रपटाच्या गुणवत्तेवर किंवा लयीवर परिणाम होत नाही. कारण पडद्यावर प्रतिमांचा आणि ध्वनीचा ओघ अव्याहत आणि एकपक्षी असा चालूच राहतो; पण तरीही संज्ञापनाची सामाजिकता उरतेच.

दूरचित्रवाणीद्वारे होणारं संज्ञापन हे जिवंत नसून जरा दूरस्थच ( remote ) असतं. टेनिस किंवा क्रिकेटची मॅच किंवा बातम्या जरी आपण थेट प्रक्षेपणाद्वारे तत्काल ग्रहण करीत असलो, तरी ते जिवंत संज्ञापन होत नाही. कारण तिथे एकगठ्ठा स्वरूपात आपण प्रेक्षक म्हणून नसतो आणि साद-प्रतिसादाचं नातं तिथे अस्तित्वात नसतं. या प्रकारच्या संज्ञापनाचा प्रेक्षकगण जरी संख्येने अगदी महाकाय असला, तरी तो विखुरलेला असतो, त्यातला प्रत्येकजण आपापल्या वैयक्तिक परिसरात बसून संज्ञापन ग्रहण करीत असतो, प्रेक्षकांचा आपापसांत संपर्क नसतो, म्हणूनच या प्रकारच्या संज्ञापनात सामाजिकता, सार्वजनिकता नसते. दूरचित्रवाणीचे कार्यक्रम पाहताना प्रेक्षकाची खाजगत, व्यक्तिगतता अबाधित असते, कारण तो स्वतःच्या घरी असतो. म्हणजेच आसपासच्या जगापासून कुठल्याही पद्धतीने विलग झालेला नसतो. गप्पा मारत, चहा पीत, मासिक चाळत तो कार्यक्रम पाहू शकतो. मधेमधे फोन येणे-करणे, दारावरची घंटी वाजणे, रस्त्यावरच्या रहदारीचा आवाज हे प्रकार चालूच असतात. त्यामुळे प्रेक्षकाची एकाग्रताही खूप खालच्या पातळीवर असते, कार्यक्रमात जरा जरी खोट वाटली, तर आपलं लक्ष तावडतोब विचलित होतं आणि ते तसं होऊ नये, म्हणून प्रयत्न करण्याची जबाबदारी निर्मात्याची असते. शिवाय हे संज्ञापन एकपक्षी असतं. त्यामुळे प्रत्येक प्रेक्षकाला धरून ठेवेल, अशा पद्धतीने घटिताचा ओघ राखणं जरुरीचं असतं. अशा रीतीने दूरचित्रवाणीत समूहापेक्षा व्यक्तिकेंद्रित संज्ञापनावर भर असतो, म्हणूनच या प्रकारच्या संज्ञापनाच्या यशाचं इंगित सांगणारे जाणते लोक; From broadcasting to narrow-casting असं सूत्र मांडतात.

३

दूरचित्रवाणीच्या विकासातले वैज्ञानिक तंत्रज्ञानावर आधारलेले टप्पे आपण मघाशी पाहिलेच आहेत. पण दूरचित्रवाणीचं पूर्ण स्वरूप समजावून घेण्यासाठी आर्थिक व सामाजिक पातळींवर या व्यवसायात झालेली स्थित्यंतरंही आपल्याला लक्षात घ्यावी लागतील. या सर्व घडामोडी तीन मोठ्या टप्प्यांमध्ये मांडता येतील.

पहिल्या टप्प्यामधल्या घडामोडी या तशा लहान वर्तुळातल्या ठराविक लोकांपुरत्या मर्यादित होत्या. तंत्रज्ञांनी तांत्रिक शक्यता निर्माण केल्या आणि मग त्यांचा उपयोग करून घेण्यासाठी इतरांना पाचारण करण्यात आलं. कार्यक्रमाच्या निर्मितीकरता लागणारी यंत्रणा कार्यान्वित करणे, तिची देखरेख करणे ही कामं तंत्रज्ञांच्या हातांत राहिली (Hardware चा विचार), तर ती यंत्रणा राबवून प्रसारणासाठी कार्यक्रम तयार करणे ही जबाबदारी लेखक, निर्माता, कॅमेरामन, ध्वनिमुद्रक, संकलक अशा लोकांकडे आली (Software चा विचार.).

दुसऱ्या टप्प्यात दूरचित्रवाणीचं तांत्रिक प्रशिक्षण घेतलेल्या लोकांची संख्या भराभर वाढली. माध्यमाचं स्वरूप जाणणाऱ्या, त्यावर विचार करून काम करणाऱ्या कुशल व्यावसायिकांच्या वाढत्या संख्येबरोबरच दूरचित्रवाणीचा प्रसार झपाट्याने झाला. उपग्रह-दळणवळणाचं युग आलं आणि शहरी वस्त्यांमध्ये तरी दूरचित्रवाणीचे संच घरोघरी दिसू लागले. त्यामुळे जाहिरात-उद्योगातल्या लोकांना या प्रकारात रस वाटला आणि त्यांनी या उद्योगात फार मोठ्या प्रमाणात शिरकाव केला. प्रेक्षागृहात दाखवली जाणारी एक ३० सेकंदांची जाहिरात, अनेक प्रती करून देशात ठिकठिकाणी जर महिनाभर दाखवली, तर सुमारे काही लाख लोकांनी ती पाहिली, असं म्हणता येत असे. पण राष्ट्रीय प्रसारणात (किंवा आंतरराष्ट्रीय पण) तीच जाहिरात एकाच प्रक्षेपणात अक्षरशः कोट्यवधी लोकांपर्यंत एकाच वेळी पोहोचू लागली. अमेरिका, पश्चिम युरोप, जपान, तसंच आपल्या देशासारख्या तथाकथित मुक्त आणि खुल्या अर्थव्यवस्थेतल्या जाहिरात-उद्योगाची आर्थिक ताकद प्रचंड मोठी आहे. लोकांना एखाद्या वस्तूकडे आकृष्ट करणे, ती वस्तू त्यांच्याकरता कशी महत्त्वाची आहे, ही गोष्ट त्यांच्या मनावर कुठल्याही विधिनिषेधाशिवाय, आणि हक्कश्राव्य संज्ञापनाचा आक्रमक स्वरूपात वापर करून त्यांच्या गळी उतरविणे हे ह्या उद्योगाचे ध्येयच आहे. या उद्योगाच्या दृष्टीने संचापुढे बसलेला प्रत्येक प्रेक्षक हा त्यांचं भावी गिऱ्हाईक असू शकतं. अशा तऱ्हेने उत्पादित वस्तूंसाठी (product) बाजारपेठा तयार करणे आणि हे करताना शक्य तितका गाजावाजा करून समाजातल्या प्रत्येक व्यक्तीपर्यंत पोहोचणे ही या उद्योगाची गरजच आहे. या प्रकारच्या संज्ञापनाच्या रोख अधिक नेमकेपणाकडे ठरलेला असतो. उदा., एका विशिष्ट प्रकारच्या साबणाच्या विक्रीसाठी कुठल्या उत्पन्नगटातील लोकांवर जाहिरातीचा रोख धरायचा, हे संशोधन करून ठरवलं जातं.

त्यानुसार मोहिमा आखल्या जातात. समूहातल्या प्रत्येकाला व्यक्तिगत पातळीवर वश करणे हे ध्येय असतं. ( Broadcasting to narrow-casting), अशा तऱ्हेचा संज्ञापनाचा विस्तार करणारी दूरचित्रवाणी मग एक विशाल सेवावाहिनी (Service Channel) बनून राहते.

तिसऱ्या टप्प्यात मात्र दूरचित्रवाणी हा रोजच्या व्यवहारातल्या अनेक उपक्रमांपैकी एक असा बनून राहतो. किंचितशा तंत्रपरिचयावर व्यावसायिक कुशलता नसलेला सामान्य माणूसदेखील ही उपकरणं चालवू लागतो. उदा., लग्नाची, समारंभाची व्हिडिओफीत किंवा वेगवेगळ्या संस्थांमधल्या लोकांनी VHS द्वारा आपल्या मर्यादित उपयोगाकरता तयार केलेले कार्यक्रम. ( VHS म्हणजे Video Home Serevice हे ध्यानात घेण्याजोगं आहे. )

सध्या आपल्याकडे दुसऱ्या टप्प्याने परिपक्वता गाठलेली दिसते आणि तिसऱ्या टप्प्याला आपण स्पर्शमात्र केला आहे, असं म्हणता येईल. दूरचित्रवाणीचा माध्यम म्हणून आजपर्यंतचा प्रवास पाहिला, तर त्यातून एक-दोन मूलभूत महत्त्वाच्या गोष्टी स्पष्ट होतात. पहिली गोष्ट म्हणजे दूरचित्रवाणी हे कलामाध्यम नसून निव्वळ एक संक्रमणमाध्यम आहे. ( medium of transmission ) आणि हे माध्यम संदेशवहन तंत्र आणि त्यातून उभी राहिलेली संस्कृती यांच्या परिघात येतं. म्हणूनच दूरचित्रवाणीचा नावाजलेला इतिहासकार एरिक बार्नो आपल्या दूरचित्रवाणीसंबंधीच्या पुस्तकाला Tube of plenty असं शीर्षक देतो, ते यथोचितच वाटतं.

## ४

आपल्या पुस्तकाच्या शीर्षकाकरता एरिक बार्नोनं दूरचित्रवाणीच्या कॅमेऱ्याच्या तसंच संचाच्या आत असलेल्या चित्रनलिकेचा ( picture tube ) संदर्भ घेतला आहे. तेच रूपक जर पुढे वाढवायचं, तर असं म्हणता येईल, की दूरचित्रवाणी ही एक बकासुराच्या भुकेची, आधाशी अन्ननलिका आहे, कारण ती जागृतावस्थेत सतत खाद्य मागत असते. लहान-मोठे चित्रपट, नाटकं, जगातल्या घडामोडींचं वृत्तचित्रण, नाच-गाणी, संगीताच्या मैफिली, माणसांच्या मुलाखती असं अनेक प्रकारचं खाद्य तिला लागतं. दुसरी मजेशीर गोष्ट म्हणजे हे सर्व खाद्यपदार्थ नलिकेच्या अंतरंगातून जसेच्या तसे आरपार निघून जातात. त्यावर दूरचित्रवाणी या माध्यमाचे म्हणून आपले काही संस्कार होत नाहीत...नाटकात किंवा चित्रपटात जेव्हा एखादी संगीतरचना वाजवली जाते, तेव्हा ती त्या नाटकाच्या मीझांसेनचा ( mise-en-scene ) किंवा चित्रपटाच्या मोंताजचा ( montage ) भाग बनते. पथेर पांचाली पाहताना पार्श्वसंगीतात जेव्हा सतार ऐकू येते, तेव्हा ती पं. रविशंकर यांची करामत म्हणून न ऐकता आपण तो ध्वनी चित्रपटाच्या एकंदर ध्वनि-आरेखाचा भाग म्हणून ऐकतो.




अनुक्रमणिका

केवळ संदेश-वहन आणि प्रसारण करणारी व्यवस्था असल्याने दूरचित्रवाणीला स्वतःचा आकार किंवा स्व-रूप नाही. रेडिओप्रमाणेच दूरचित्रवाणीच्या संदर्भात बोलताना आपण 'कार्यक्रम' हा शब्द वापरतो. या कार्यक्रमांची आशयानुसार कथात्मक ( Fiction ) आणि कथाविरहित ( Nonfiction ) अशी मोठी विभागणी आपल्याला करता येते. या कार्यक्रमांच्या विधा ( genres ) जर आपण पाहिल्या, तर चित्रपट, नाट्यकला, आणि रेडिओ यांच्याशी परिचित माणसाला त्यात नवीन असं फारसं आढळणार नाही. प्रसंगनिष्ठ विनोदावर आधारित अशा सिटकॉम्स ( Sitcoms किंवा Situation Comedies— उदा०, यह जो है जिंदगी ), पोलिसी चातुर्यकथा ( शेरलॉक होम्स, ओल्ड फॉक्स, करम-चंद ), अनेक एकापाठोपाठ येणाऱ्या भागांमधून उलगडत जाणारी कौटुंबिक, सामाजिक विषयांवरची मालिका ( हम लोग, बुनियाद ), कादंबरीचं मालिका ह्या रूपातलं चित्रण ( राग दरबारी ), चर्चात्मक कार्यक्रम (फोकस), सामाजिक विषयांवरचे, समस्यांवरचे अनुबोधपट ( कसौटी ), बातम्या, खेळांचं समालोचन, जाहिराती, व्यक्तींशी घडवून आण-लेल्या भेटवार्ता, संमेलन-परिषदा यांचं थेट प्रक्षेपण या सर्व विधांची पाळंमुळं चित्रपट, नाट्यकला, रेडिओ आणि वृत्तपत्रं या माध्यमांमध्ये स्पष्ट दिसून येतात. अलीकडे खास दूरचित्रवाणीकरताच तयार करायचे चित्रपट ( telefilms ) आणि नाटकं ( teleplays ) या कल्पनेनं आपल्याकडे जरा कुठे मूळ धरलं आहे.

हे झालं दूरचित्रवाणी किंवा प्रसारणात्मक चित्रवाणी ( Broadcast TV ) बद्दल; पण केबल टीव्ही, व्हिडिओ याही छोट्या पातळीवरच्या प्रसारणाच्या अन्य शक्यता आहेत आणि कालांतराने त्या आपल्याकडेही मोठ्या प्रमाणावर येऊ शकतील. शिवाय तबकडी-अँटेना ( Dish Antenna ) सारख्या उपकरणांमुळे, आज आपल्याला जसे रेडिओवर आंतरराष्ट्रीय कार्यक्रम सहज उपलब्ध होऊ शकतात. तसे दूरचित्रवाणीवरही मिळू शकतील. हा झाला पुढचा विचार, पण सध्यातरी आपल्या दूरचित्रवाणीच्या नलिकेत चित्रपट किंवा चित्रपटसृष्टीशी संबंधित असं काहीही करमणूकप्रधान भरपूर प्रमाणात कोंबण्याकडे कल आहे.

## ५

या लेखमालेला सुरुवात करताना चित्रपट आणि इतर प्रमुख कलांच्या तौलनिक विचाराने सुरुवात केली होती. आता समारोपाच्या वेळी सर्व लेखमालेतले प्रमुख मुद्दे उजळणीच्या रूपात मांडतो.

चित्रपट हे शास्त्रीय तंत्रज्ञानामुळे जन्माला आलेलं आणि स्वतःचं अस्तित्व तसंच प्रगतीकरता पूर्णपणे तंत्रज्ञानावरच अवलंबून असलेलं, विचार आणि भावना व्यक्त करण्याचं एक यांत्रिक माध्यम आहे.

जगातल्या प्रमुख कलांपैकी हीच एकमेव कला अशी आहे, की जिचा अथपासूनचा

इतिहास ज्ञात आहे.

चित्रपट हा एखाद्या, बाह्य जगापासून मुद्दाम वेगळ्या केलेल्या वास्तूत, पूर्ण अंधारात बसलेल्या प्रेक्षकांपुढे, पडद्यावर उमटणाऱ्या आणि सतत बदलणाऱ्या प्रतिमांद्वारे आणि प्रत्यक्षात ऐकू येणाऱ्या वेगवेगळ्या ध्वनींमार्फत सादर केला जातो.

शॉट् म्हणजे प्रकाशचित्रणाचा एक सलग तुकडा या चित्रपटाच्या रचनेचा मूळ घटक आहे.

अनेक शॉट् आणि ध्वनींची पडद्यावर अखंडितपणे उमटणारी साखळी याद्वारे चित्रपट आकाराला येतो. ही साखळी संकलनात नेमकी घडवलेली असते.

चित्रपट ही संगीतासारखीच एक कालबद्ध कला आहे.

चित्रपट हे एक मुद्रणमाध्यम आहे. त्यामुळे चित्रकला, संगीत अशांसारख्या इतर कलांमधली मूल्यं आणि घटक वापरून, बहुविध परिणाम साधणारी समर्थ, एकसंध चित्रपटीय रचना चित्रपटात सहज रचता येते.

काटेकोर निकषावर बोलायचं, तर चित्रपट ही भाषा ठरत नाही, पण दृश्यकलांच्या, नाट्यकलांच्या भाषांमधले घटक एकत्र आणणारी ती एक व्यवस्था आहे. त्यामुळे एखाद्या चित्रपटीय रचनेत, एकाच वेळेला अनेक ' भाषा ' वापरल्या गेलेल्या दिसतात. अशा प्रकारे विविध भाषाव्यवस्थांच्या दुनियेत बहुविध भाषा एका चौकटीत राबवणारा चित्रपट हा जणू ' भाषानियंत्रक ' ( controller of languages ) आहे. चित्रपटाची इतर कला आणि माध्यमांशी असलेली नातीगोती सूक्ष्म आणि खोलवरची आहेत.

चित्रपट जगातल्या वस्तूंच्या, माणसाच्या, इतर घडामोडींच्या दृक्श्राव्य नोंदी करतात. या नोंदी हा कालांतराने ऐतिहासिक पुरावा ठरतो.

चित्रपटाद्वारे मनोरंजनाबरोबरच अशिक्षितांचंही उद्बोधन किंवा शिक्षण उत्तम प्रकारे होऊ शकते. भाषेसारखा लिपिज्ञानाचा अडथळा तिथं येत नाही.

चित्रपट ही पूर्णपणे लोकशाहीच्या युगातली, विसाव्या शतकातल्या तंत्रज्ञानावर आधारलेली कला आहे. ती सामूहिक कला असून प्रथमपासून तिची भरभराट ही लोकाश्रयावरच झालेली आहे. चित्रपटाच्या प्रेक्षकवर्गांत आजही निरक्षर आणि कष्टकरी समाजातल्या लोकांची बहुसंख्या आहे. त्यामुळे अनेक ठिकाणी, खास करून भारतात तर फारच प्रकर्षाने, उच्चभ्रूंमध्ये चित्रपटाला फारशी प्रतिष्ठा नाही. चित्रपट आणि चित्रपटसंस्कृती हा ( भारतासारख्या देशात तर खास करून ) स्वतंत्र अभ्यासाचा व्यासंगाचा विषय होऊ शकतो, या विचारांची पहाट आमच्या विद्यापीठांमध्ये अजून होतेच आहे.

चित्रपटाचे सामाजिक, राजकीय पातळीवर होणारे परिणाम फार व्यापक आहेत. आपल्या चित्रपटसंस्कृतीच्या अभ्यासातून आपल्या समाजजीवनाबाबत महत्त्वाचे निष्कर्ष काढता येतात.

मूक चित्रपटांच्या जमान्यात काम करणाऱ्या एका सोविएत दिग्दर्शकाने या माध्यमावर

केलेले चिंतन आणि मनन आज साठ वर्षांनंतरच्या रंगीत, ध्वनिचित्रपटांच्या काळातही तितकंच उद्‌बोधक वाटतं. या माणसाचं नाव आहे. झिगा वेर्तोव आणि त्याचे नेमके शब्द असे आहेत.

(१) यंत्र कसं वापरावं

पहिला मुद्दा : कॅमेरा हा सिनेमाक्ष म्हणून वापरण्यात यावा.

असा एक सिनेमाक्ष– जो जग व्यापून टाकणाऱ्या दृष्टिगम्य घडामोडींच्या सावळ्या-गोंधळाचा शोध घेण्यात मानवी डोळ्यापेक्षा कितीतरी अधिक नेमका असेल.

(२) असा मी असा मी

...मी आहे डोळा. एक यांत्रिक डोळा.

मी, एक यंत्र तुम्हांला असा एक शब्द दाखवतो आहे, की ज्यासारखे शब्द केवळ मीच पाहू शकतो.

मी, स्वतःला 'आज'पासून आणि मानवी जडतेपासून मुक्त करतो, मी सतत हालचाल करतो, मी वस्तूंच्या जवळ जातो तसंच लांबही, मी त्यांच्या खाली रांगतो, मी दौडणाऱ्या घोड्याच्या अगदी तोंडाजवळून पळतो, मी पूर्ण वेगाने भर गर्दीत घुसतो, मी पळणाऱ्या सैनिकांच्या पुढ्यात पळतो, मी माझ्या पाटीवर वळतो, मी विमानाबरोबरच वर झेपावतो, मी पडणाऱ्या आणि उसळणाऱ्या सर्वांबरोबर खालीवर उसळतो. हा मी आहे.

एक यंत्र, बेशिस्त हालचालींमधून वाट काढत, एकाहून एक गुंतागुंतीच्या हाल-चालींची नोंद ठेवणारं...

माझी वाट ही विश्वाच्या नवनवीन आकलनाकडे जाते.

अशा रीतीने, तुम्हांला ठाऊकही नसलेलं जग मी एका नवीन पद्धतीनं उलगडून दाखवतो.

४३३/१८, सारस्वत वसाहत, सोमवार पेठ, पुणे ४११ ००१.

चित्रपटलेखमाला समाप्त

# प्रभाकर ऊर्ध्वरेषे : एक संस्मरण

**मधुकर विश्वनाथ घासकडबी**

प्राध्यापक ऊर्ध्वरेषे यांच्या पुणे येथे १० जुलै, १९८९ ला अकस्मात झालेल्या दुःखद निधनामुळे इंग्रजी विषयाच्या माझ्यासारख्या अनेक समवयस्क कॉलेज–शिक्षकांमध्ये कमालीची खिन्नता व मित्रवियोगाची भावना निर्माण होणे स्वाभाविकच आहे. एक उमद्या स्वभावाचा समव्यवसायी विचारवंत, लेखक, मित्र व शिक्षक आता आपल्यात बसून जिवंत पुरोगामी विचार हिरिरीने मांडून चर्चा, गप्पा, व हास्यविनोदात रंग भरणार नाही, हे आमचे दुर्दैव.

त्यांचा आणि माझा प्रत्यक्ष परिचय किर्लोस्करने घेतलेल्या एका परिसंवादात पंचवीस-एक वर्षांपूर्वी झाला. या परिसंवादात ग्रामीण भागातील महाविद्यालये, त्यांचे शैक्षणिक प्रश्न, विद्यार्थ्यांच्या अपेक्षा व अडचणी, आणि विशेषतः प्राध्यापकांचे ग्रामीण जनतेशी संबंध व त्यांची सामाजिक जबाबदारी, इत्यादी प्रश्नांवर उपयुक्त चर्चा झाली व ती प्रसिद्धही झाली होती. विद्यार्थ्यांच्या व त्यांना शिकविणाऱ्यांच्या अडचणी सोडविण्याकरिता पारंपरिक मार्ग सोडून वास्तववादी अभ्यासक्रम, अध्यापनपद्धती स्वीकारणे आवश्यक आहे, शिक्षणाचा प्रत्यक्ष जीवनाशी निकटचा संबंध ठेवलाच पाहिजे, हे त्यांचे प्रतिपादन माझ्याही दृष्टीने योग्य असल्यामुळे आमच्यांत सुसंवाद निर्माण झाला, आणि नंतर वेळोवेळी आमच्या गाठीभेटी होत राहिल्या.

या परिसंवादाच्या सुमारास आपल्याकडे इंग्रजी साहित्य व भाषा यांचे महत्त्व, इंग्रजीचे परभाषा म्हणून अध्यापन आणि त्यांच्या रचनालक्षी पद्धतीसारख्या नव्याजुन्या पद्धती, पारंपरिक अध्यापनात पाठांतराला दिलेले अवाजवी महत्त्व, शिक्षकांना येणाऱ्या अडचणी, इत्यादी विविध मुद्द्यांवर चर्चा सुरू झाली. चर्चासत्रे, उन्हाळी प्रशिक्षणसत्रे होऊ लागली. इंग्रजी भाषा शिकविण्याला योग्य महत्त्व देऊन त्यानुरूप नवी पुस्तके व पाठ्यक्रम पुढे आले व स्वीकारले गेले. १९६५ च्या सुमारास पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये 'इंग्रजी साहित्य व इंग्रजी भाषा' यांवर प्राध्यापकांचे एक चर्चासत्र झाले. त्यात प्राध्यापक ऊर्ध्वरेषे यांच्याबरोबर मीही सहभागी झालो होतो. आम्ही दोघांनीही सर्वसाधारण विद्यार्थ्यांना अनावश्यक व जड असे इंग्रजी साहित्य सरसकटपणे न शिकवता इंग्रजी भाषा उपयुक्ततेच्या दृष्टीने शिकविली पाहिजे, हे स्पष्टपणे मांडले. त्यावर खूपच वाद झाला. प्राध्यापक ऊर्ध्वरेषेंनी वेळोवेळी लेखांतून व चर्चांतून अशीच पुरोगामी भूमिका मांडली. एखाद्या विषयाचे केवळ तास घेऊन परीक्षार्थी विद्यार्थी तयार करू नयेत, प्रामाणिकपणे व प्रयत्नपूर्वक शिकवावे, आर्थिक लाभावर अवाजवी भर देऊ नये, सामाजिक बांधिलकी मानली पाहिजे, अशी त्यांची विचारसरणी होती. त्याचबरोबर प्राध्यापकांच्या नोकरी, वेतन वगैरेंच्या समस्या

सोडविण्याकरिता व प्राध्यापकांना योग्य न्याय मिळविण्याकरिता सुसंघटितपणे प्रयत्न करण्याकरिता प्राध्यापक ऊर्ध्वरेषे झटत असत. महाराष्ट्र सरकारने १९८२ पासून निवृत्ति वेतनाची सोय केली. त्यामुळे कॉलेजच्या कर्मचाऱ्यांच्या जीवनाला स्थैर्य प्राप्त झाले. दुर्दैवाने १ ऑक्टोबर या तारखेपूर्वी निवृत्त झालेले शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना निवृत्ति-वेतनाचे फायदे मिळाले नाहीत. १९८५ मध्ये निवृत्तिवेतनाचे सर्व फायदे १-१०-१९८२ पूर्वी निवृत्त झालेल्यानांही मिळावेत, याकरिता पुणे येथे महाविद्यालयांतील व विद्यापीठांतील कर्मचाऱ्यांनी संघटना निर्माण केली. त्यात प्राध्यापक ऊर्ध्वरेषे यांचा महत्त्वाचा वाटा होता. आता १-१-१९७३ नंतर निवृत्त झालेल्या सर्व सेवकांना निवृत्ती वेतन मिळत आहे. पण त्याचबरोबर शिक्षकांनी आपली जबाबदारी निष्ठेने पार पाडून विद्यार्थ्यांना ज्ञान व संस्कार देण्याचे उत्तरदायित्व मान्य केलेच पाहिजे, हा विचारही त्यांनी सतत मांडला.

त्यांचे पूर्वायुष्य मोठे आकर्षक व आदर्शवादी होते. त्यांचा जन्म १९१८ मध्ये झाला आणि इंदूरला त्यांचे शिक्षण झाले. १९३०-४० या विशिष्ट कालखंडातील आमच्या तरुण पिढीवर मार्क्सवादी विचार, रशियातील साम्यवादी राज्यक्रांती व त्या देशाने केलेली त्यानंतरची स्वतःची डोळ्यांत भरणारी प्रगती, भारतीय स्वातंत्र्य चळवळ, सामाजिक सुधारणा व प्रागतिक नवमतवादी विचारसरणी या सर्व गोष्टींचे खोलवर संस्कार झाले. बर्नर्ड शॉ किंवा बर्ट्रँड रसेल यांच्यासारख्यांचे लेख, मार्क्सवाद, इत्यादींवर चर्चा करणाऱ्या अभ्यास मंडळांचा तो काळ होता. ऊर्ध्वरेषे या काळात भारतामधील साम्यवादी विचार-सरणीकडे आकृष्ट झाले. १९४१ साली आपले इंदूर शहर सोडून ते मुंबईला आले व पूर्ण वेळ भारतीय कम्युनिस्ट पार्टीचे काम करू लागले. त्यांच्या सुविद्य पत्नी उषाताई याही त्यांच्याबरोबर यात सामील झाल्या. नवविवाहितांची स्वप्ने व सुखे सोडून कम्यूनमध्ये ८-९ वर्षे राहून दोघांनीही तुटपुंज्या वेतनावर निष्ठापूर्वक काम केले. पार्टीचे मुखपत्र ' लोकराज्य ' यात संपादक, लेखक, प्रूफतपासनीस यांचे व वेळप्रसंगी अंकांच्या गठ्ठ्यांचा भारही वाहण्याचे काम केले. पण कम्युनिस्ट पक्षाच्या पोथीनिष्ठ आणि रशियन कम्युनिस्ट पार्टीच्या तोंडाकडे पाहणाऱ्या विचारांचा मनोमन स्वीकार ते कधीच करू शकले नाहीत. हळूहळू त्यांना या सर्व प्रकाराचा उद्वेग आला. त्यांचा संपूर्ण भ्रमनिरास झाला व त्यांनी ८-९ वर्षे प्रामाणिकपणे अनेक अडीअडचणींतून पक्षाचे काम केले असूनही कम्युनिस्ट पक्ष सोडला. ( आयुष्यातल्या या पर्वाबद्दल त्यांनी नुकत्याच प्रकाशित झालेल्या **हरवलेले दिवस** या आत्मनिवेदनपर पुस्तकात लिहिलेच आहे. ) आता ते आपल्या आवडत्या इंग्रजी भाषा आणि साहित्य या विषयाच्या अध्यापनाकडे वळले. त्यासाठी भाषाविज्ञान विषयाची माहिती असणे जरूर आहे, हे लक्षात आल्यावर त्यांनी उन्हाळी वर्गातून आणि नंतर एक वर्षभर फेलो म्हणून डेक्कन कॉलेजमध्ये त्या विषयाचे अध्ययन केले. महाविद्यालयीन पातळीवर इंग्रजी शिकवण्याचा १८ वर्षांचा अनुभव गाठीशी बांधून नंतर ते नागपूर विद्या-पीठात इंग्रजी विषयाचे रीडर आणि नंतर प्रमुख झाले. १९७८-७९ मध्ये ते निवृत्त झाले

व काही काळानंतर पुण्यात स्थायिक झाले. मी १९८५ मध्ये पुण्यात स्थायिक झाल्यानंतर गेली ३–४ वर्षे मला त्यांचा अधिक सातत्याने सहवास घडला. ऊर्ध्वरेषे, भागवत, जमदग्नी वगैरे आम्ही सर्व समवयस्क निवृत्त इंग्रजीचे प्राध्यापक भेटत असू व चर्चा, गप्पा होत. निवृत्तिवेतन मिळाल्यानंतर आमचे मंडळ केवळ आर्थिक प्रश्नाकरता चालू न ठेवता चर्चा, निबंधवाचन, सांस्कृतिक व सामाजिक कार्य वगैरे चालू ठेवण्याकरिता एक गट करून काही नवा कार्यक्रम हातांत घ्यावा, असे प्राध्यापक ऊर्ध्वरेषेंनी सुचवले. आमच्याही मनात तसेच काही विचार घोळत असल्यामुळे आम्ही ती सूचना आनंदाने स्वीकारली आणि आता कामाला सुरुवात करणार, इतक्यात आमच्या दुर्दैवाने आम्हांला प्राध्यापक ऊर्ध्वरेषे यांच्या साथीला मुकावे लागत आहे. त्यांची आठवण आम्हाला सतत राहील व त्यांची गैरहजेरी पदोपदी तीव्रतेने जाणवेल.

प्राध्यापक ऊर्ध्वरेषे यांचे गेल्या चार-एक वर्षांतील साप्ताहिक **सोबत**मध्ये प्रसिद्ध झालेले लेख माझ्या वाचनात आले. त्या वरून त्यांच्या विचारांची व लेखनाची आणि काही प्रमाणात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची कल्पना सहज येऊ शकते. या लेखांपूर्वी त्यांची तीन पुस्तके प्रसिद्ध झालेली मला माहीत आहेत. त्यात गॉर्कीच्या **आई** या कादंबरीचा मराठी अनुवाद हे विशेष गाजले व त्यांना १९६७ मध्ये **सोविएत लँड** नियत-कलिकाचा नेहरू पुरस्कार मिळाला. त्यांच्या १९६९ मध्ये नागपूरला प्रसिद्ध झालेल्या **द स्टोरी ऑफ्‌ लँग्वेज** या लहानशा पुस्तकात भाषेचा अभ्यास करणाऱ्या शाळा-कॉलेजांतील विद्यार्थ्यांना इंग्रजी भाषेविषयी व त्याच अनुषंगाने येणाऱ्या भारतीय भाषांसंबंधी प्राथमिक स्वरूपाची माहिती रोचक पद्धतीने मांडली आहे. आजच्या विद्यार्थिवर्गाचे व त्यांना इंग्रजी शिकवणाऱ्या प्राध्यापकांचे ज्ञान आणि कौशल्य व आज आपणां सर्वांसमोर असलेल्या काही समस्या यासंबंधीचे विचार पुण्याच्या साप्ताहिक **सोबत**मध्ये वेळोवेळी प्रसिद्ध झाले आहेत. त्यांची ओळख करून देणे मला आवश्यक वाटते. कारण आज या शैक्षणिक समस्या आपल्या सर्वांसमोर ताज्या आहेत. हे लेख म्हणजे—

१. इंग्रजीची खिडकी, मराठीचे डोळे ( १४–७–८५ )
२. इंग्रजी बागुलबुवा आता पुरे झाला ( २–२–८६ )
३. इंग्रजीचे अध्ययन, अध्यापन व संशोधन ( ४–५–८६ )
४. इंग्रजीच्या अध्यापनाची समस्या कशी सुटेल ? ( २३–३-८७ )
५. इंग्रजी वाङ्मयाचे अध्ययन व अध्यापन ( १०–५–८७ )
६. इंग्रजीत नापास कोण ? विद्यार्थी, शिक्षक, की शासन ? ( ९–८-८७ )
७. हे पाहा आमच्या इंग्रजीच्या प्राध्यापकांचे संशोधन ( ४–१०-८७ )
८. शेक्सपियर कसा शिकवावा ? ( २०-३-१९८८ )
९. इंग्रजी साहित्याचे अध्यापन : ना. ल. वैद्यांना उत्तर ( १९–६–८८ )

'इंग्रजीची खिडकी. मराठीचे डोळे' या लेखात विज्ञान, तंत्रज्ञान, वैद्यक, उच्च व सर्वोच्च न्यायालये, आंतरराष्ट्रीय संबंध, उद्योगधंदे व व्यापाराच्या क्षेत्रातील सर्वोच्च पातळीवरील व्यवहार व केंद्र सरकारचा बराचसा कारभार अशा काही क्षेत्रात इंग्रजीचे महत्त्व कायम राहणे आता अटळ असले, तरी राज्यपातळीवरील व जिल्हा व तालुका पातळीवरील कारभार आणि लोकजीवन, साहित्य, वृत्तपत्रे वगैरे क्षेत्रात प्रादेशिक भाषांचे महत्त्व वाढत जाणे हेही तितकेच अटळ आहे. तेव्हा बहुसंख्य लोकांना इंग्रजीचे त्यांच्या विशिष्ट गरजांपुरते ज्ञान असले, म्हणजे पुरे, असे ते म्हणतात. प्रादेशिक भाषांच्या माध्यमांच्या शाळातून जे इंग्रजी शिकवले जाते त्याचा दर्जा सुधारण्यासाठी कसोशीने प्रयत्न करण्याची शासनाकडे लोकांनी मागणी केली पाहिजे. गेल्या वीस-पंचवीस वर्षांत झालेल्या अशा प्रयत्नांचे कठोर मूल्यांकन झाले पाहिजे व काही मर्यादित अर्थाने इंग्रजीही आमच्या गरजांच्या दृष्टीने आमची खिडकी असली, तरी आमचे डोळे प्रादेशिक भाषांचे—म्हणजे महाराष्ट्रात मराठीचे असले पाहिजेत, असे त्यांचे प्रतिपादन आहे.

'इंग्रजी बागुलबुवा आता पुरे झाला' या लेखात इंग्रजीच्या वाढत्या हव्यासामुळे व अध्यापनामुळे मराठीला वाचकवर्गच राहणार नाही व ती नामशेष होईल वगैरे बागुलबुवा उभा करण्यापेक्षा काही क्षेत्रांत इंग्रजीचे महत्त्व कायम राहूनही प्रादेशिक पुस्तकांचा वाचकवर्ग कसा वाढेल, याचे प्रयत्न झाले पाहिजेत व ते अधिक जिद्दीने झाले पाहिजेत. इंग्रजीचे अध्ययन हे प्रादेशिक भाषेला मारक नाही, हा मुद्दा मांडून हे अध्यापन करीत असताना येणाऱ्या समस्यांचा ते विचार करतात.

या समस्यांमधे प्रामुख्याने अभ्यासक्रम कसा असावा, पुस्तके व साहित्य कोणते असावे वगैरेबाबतचे विचार या तीन-चार लेखांत मांडले आहेत. शीर्षकांवरून या लेखांतील विचारांचे दिग्दर्शन सहज होऊ शकते. सर्वसाधारणपणे 'इंग्रजीची खिडकी...' या लेखात सांगितल्याप्रमाणे एका विशिष्ट उद्देशाने इंग्रजी शिकवावे, त्याकरिता शिक्षकांनी जाणीवपूर्वक व कर्तव्यबुद्धीने काम करावे, त्यांना योग्य ते मार्गदर्शन मिळण्याची सोय असावी, अशा प्रकारचे प्रतिपादन त्यांनी केलेले आहे. यासंबंधात आणखी एका महत्त्वाच्या मुद्द्याची चर्चाही या व इतर लेखांत आढळते. सर्वच विद्यार्थ्यांना इंग्रजी शिकविताना साहित्यावर अवाजवी भर देणाऱ्या पारंपरिक पद्धतीचा त्याग करून उपयुक्ततेच्या व्यावहारिक दृष्टिकोनातून शिकविले पाहिजे. शेक्सपियर, चॉसर, इत्यादी महान् साहित्यिकांच्या कलाकृतींचे रसग्रहण करण्यापेक्षा इंग्रजी भाषेवर प्रभुत्व मिळवून एक साधन या दृष्टीने तिचा कौशल्याने उपयोग करायचेच प्रयत्न सर्वसाधारण विद्यार्थ्यांकडून करवून घेतले पाहिजेत. तरच इंग्रजीच्या अध्ययन व अध्यापनातील समस्या सुटू शकतील. अशा प्रकारचे विचार स्पष्टपणे आणि परखडपणे मांडून त्यांनी वाचकांना, पालकांना व शिक्षकांना जागे केले आहे. हे सर्व लेख मराठीत असल्यामुळे सर्व वाचकांपर्यंत सहजपणे पोचू शकतील.

इंग्रजी साहित्याचे अध्यापन ज्या विद्यार्थ्यांना करायचे, ते कोणत्या उद्देशाने आणि

कोणत्या पद्धतीने करायचे, हाही त्यांच्या चिंतनाचा विषय काही लेखांमधून आलेला आहे.

परभाषेतील साहित्याच्या अभ्यासाचे माध्यमही स्वभाषा ( भारतीय संदर्भात प्रादेशिक भाषा ) असावे, असे विचार त्यांनी मांडले होते. त्यावर ना. ल. वैद्य यांनी १७-४-१९८८ च्या अंकात ऊर्ध्वरेषेंचा हा मुद्दा विचारार्ह आहे, असे म्हणून काही प्रमाणात सहमती दाखवून कोणत्याही भाषेतील साहित्याचा पूर्ण रसास्वाद मूळभाषेतूनच घेता येतो, असा प्रतिविचार मांडला होता. यावर उत्तर म्हणून ऊर्ध्वरेषे यांनी विचार मांडले आहेत. वैद्यांचे म्हणणे रास्त आहे, असे मान्य करून ऊर्ध्वरेषे विचारतात, की हे 'व्यवहार्य' आहे का ? प्रादेशिक भाषा हीच मातृभाषा असलेल्या आपल्या विद्यार्थ्यांना हे शक्य नाही. किंबहुना त्याची तितकी गरजही नाही. इंग्रजी किंवा इतर कुठल्याही भाषेचे विद्यार्थी ग्रीक वा रशियन साहित्याचा अभ्यासही त्यांच्या स्वतःच्या भाषेतूनच करतात. भाषांतरित साहित्याचे स्थान व अभ्यास यांविषयी व भाषांतर आणि भाषांतरपद्धती यांवर आजकाल खूपच उपयुक्त चर्चा होत आहे. त्या संदर्भात दोघां लेखकांच्या चर्चेचा विचार करता येईल.

याबाबत एवढे मात्र खरे, की आत्तापर्यंत आपल्या शाळा-कॉलेजांतून भाषांतरपद्धती वापरीत असू. त्याचे बरे-वाईट परिणाम आपल्या इंग्रजी शिकविण्यावर झालेले आहेत. याची जाणीव ठेवून इंग्रजी साहित्याचे अध्यापन व इंग्रजी भाषेचे अध्यापन यांतील स्पष्ट भेद मनात सतत बाळगला पाहिजे.

दुसरा एक विचार मला मांडावासा वाटतो, तो म्हणजे सध्याच्या पद्धतीत शिकलेला आमचा विद्यार्थी इंग्रजी भाषेबद्दल अवांतर जाणतो पण इंग्रजी भाषा जाणत नाही, इंग्रजी साहित्याबद्दल अवांतर माहिती जाणतो; पण इंग्रजी साहित्य जाणत नाही.

आमच्या या उमद्या मनाच्या, तरुणांना लाजवील, असा उत्साह शेवटपर्यंत टिकून असणाऱ्या, समाजापुढील प्रश्नांचा कळकळीने विचार करणाऱ्या आणि ते सोडवण्यासाठी सतत काही करू पाहणाऱ्या मित्राला ही श्रद्धांजली !

**अहमदनगर महाविद्यालयातून इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून निवृत्त,**

**वसंतबहार, ११९ बी, प्रभात रस्ता, पुणे ४११ ००४.**

[ मराठी अभ्यास परिषद (१९८२) आणि परिषदेची पत्रिका (१९८५) यांना सुरुवातीपासून उत्साहाने पाठिंबा देणाऱ्या वडीलधाऱ्या मंडळींमध्ये चिरस्मृत प्रभाकर वामन ऊर्ध्वरेषे यांचे नाव प्रामुख्याने घ्यायला पाहिजे. 'इंग्रजीची खिडकी, मराठीचे डोळे' ही परिषदेने ग्रंथालीसमवेत काढलेली चिकटचिठ्ठी त्यांना आवडायची आणि तिचा उपयोग त्यांनी शीर्षकासाठी तसा उल्लेख करून केला. पत्रिकेत प्रकाशित झालेले त्यांचे लेखन म्हणजे– 'परभाषांतील नावांचे उच्चार कसे करावे ? प्रसारमाध्यमांच्या समस्या व उपाय', ३:१:६–१२, हिवाळा १९८५—संपादक ]

# मराठी भाषेतली लागालागी आणि लावालावी

नीति बडवे

अग 'आई ग, काय जोराची ठेच लागली! वेळ नाही, म्हणून भूक लागली असून खाल्लं नाही. आता पायाला लागलं, म्हणून गाडी चुकते, की काय! गाडी तर केव्हाची लागली असेल प्लॅटफॉर्मेला. या पावसाळ्याच्या दिवसांत काही तशी ज़ागा धरावी लागत नाही. बस लागते, म्हणून गाडीसाठी धडपड. शिवाय गाडीने जाताना वाटेत कर्जत लागतं. तिथल्या वड्यांची ओढ लागलेली. पण घरी गेल्यावर खाल्लं नाही, तर ते आईला लागतं. दिवे लावण्याच्या वेळेला घरी पोहोचलेलं बरं. शिवाय आज टी. व्हीवर आवडता कार्यक्रम लागणार आहे. आमच्या शेजाऱ्यांनाही माझं फार लागतं आहे. आमच्या रेडिओवर सिलोन नीट लागत नाही. त्यामुळे रेडिओवर माझ्या आवडीचं गाणं लागलं, की लगेच टेप करून ठेवतात. शिवाय मला 'हे' लागतं, 'ते' लागतं, म्हणून कौतुकही करतात. मला जरा लागलेल्याच काचऱ्या आवडतात, म्हणून काचऱ्या लागल्या, की माझी आठवण काढतात, आणि 'लागली होती का ग, उचकी' म्हणून विचारतात. इतक्या प्रेमळ शेजाऱ्यांसाठी या ना त्या हातानं काहीतरी करावंच लागतं. परवाच त्यांच्या नातवाला तिसरं लागलं, म्हणून त्यांना साडी घेतली. तो जायला लागला आता शाळेत. आता पुढची १५-२० वर्षं शाळाकॉलेज त्याच्या मागं लागलं. त्याचा इंजिनियरिंगच्या यादीत नंबर लागेल का, याची आजींना आत्तापासूनच काळजी लागली आहे. 'नाही, तर आपली सरळ त्याच्या नावावर लॉटरीची तिकिटं घ्यायला लागायची' म्हणत होत्या. 'कुणी सांगावं, लागून जायची एखाद वेळेला!'

याखेरीज कीड लागली, नजर लागली, दृष्ट लागली... आंब्याला मोहोर लागला, दही लागलं, दही छान लागलं, इत्यादी इत्यादी हे आहेच किंवा एकदम ट्यूबच लागली... त्याचं असं झालं.

आमच्याकडे सध्या एक अमेरिकन पाहुणी आली आहे. मराठी शिकतेय्.

परवा रात्री आम्ही असंच बाहेरच्या खोलीत गप्पा मारत बसलो होतो. तिच्या आत-मधल्या खोलीत दिवा तसाच चालू राहिला होता. माझी बहीण काहीतरी कामाला उठली, तर ही तिला म्हणते,

"माझ्या खोलीतला दिवा लाव."

आम्हांला कोणालाच काही कळलं नाही, की ही अशी काय म्हणतेय.

माझी बहीण म्हणाली.





अनुक्रमणिका

" काय करू ? "

ही परत म्हणते.

" तिथला दिवा लाव. "

माझी बहीण म्हणाली.

" म्हणजे बंद करू का ? "

– ती म्हणाली.

" हो. लाव ! "

मग माझ्या बहिणीने तिला सांगितलं.

" दिवा तर लावलेलाच आहे. आता तो ' बंद कर ', असं सांगायचं. "

त्यावर ही म्हणते.

" मग ' दार लाव ' म्हणजे काय ? "

तेव्हा आमच्या सगळ्यांच्या डोक्यात ट्यूब लागली. म्हणजे खरं तर आमच्या पाहुणीनं लावली !

' दार लाव ,' ' खिडकी लाव ' मधे लावणे म्हणजे ' बंद कर ', पण ' टी. व्ही. लाव ', ' रेडिओ लाव ', ' गॅस लाव ', ' दिवा लाव ' मधे लावणे याचा अर्थ ' सुरू कर ' असा विरुद्ध अर्थी होतो !

आधुनिक युरोपीय भाषा व जपानी भाषा विभाग,
पुणे विद्यापीठ, रानडे इन्स्टिटयूट, पुणे ४११ ००४

**प्रश्नाळू**

मी सहा इमानी नोकर ठेवले आहेत
( जे काही मी जाणतो सगळे त्यांनीच शिकवले )
त्यांची नावे ना ? काय आणि का आणि का आणि कधी आणि कसे आणि कुठे आणि कोण

**रड्यर्ड किप्लिंग ( इंग्लिश कवी १८५५–१९३६ )**

# भाषाविकासातील कोशकार्यांचे महत्त्व

**प्रमोद तलगेरी**

[ डॉ. प्रमोद तलगेरी दिल्लीच्या जवाहरलाल नेहरू विद्यापीठात जर्मन विभागाचे प्रमुख आहेत. त्यांनी एका चर्चासत्रात भाषाविकास आणि भाषाकोश यांच्या परस्पर संबंधांविषयी मांडलेले विचार **भाषा आणि जीवन**च्या वाचकांपर्यंत पोहोचावे, म्हणून ते संक्षिप्त अनुवादाच्या स्वरूपात पुढे दिले आहेत. त्यांपैकी काही विचार तर आपल्याला अंतर्मुख करतील, असे आहेत. प्रा. तलगेरींनी आपलं विवेचन प्रामुख्याने मराठी आणि कोकणी भाषेच्या संदर्भात केलं आहे. पण त्यांनी इथे उपस्थित केलेले मुद्दे इतरही भारतीय भाषांना लागू करता येतील. ]

स्वातंत्र्योत्तरकाळात भारताची प्रांतवार पुनर्रचना झाली. पण भाषाविषयक धोरण आणि प्रादेशिक भाषांचा विकास यांविषयी वाद मात्र अजूनही चालूच आहेत. या सगळ्या चर्वितचर्वणात आपण एक गोष्ट साफ विसरूनच गेलो आहोत, की एखादी भाषा लोक बोलत राहिले, लेखक त्या भाषेत लिहीत राहिले, भाषांतरकार इतर भाषांतील मौलिक खजिने आपल्या भाषेत भाषांतरित करीत राहिले, आणि भाषावैज्ञानिक आणि कोशकार त्या भाषेविषयी सातत्याने नोंदी करीत राहिले, तरच ती भाषा जगू शकते आणि वृद्धिंगत होऊ शकते.

रोजच्या वापरातले शब्द, शब्दभेद आणि शैलीविशेषांची कोशात दखल घेतली जाते. बदलत्या समाजामधे भाषेला एक गतिशील सातत्य असतं. कोशात भाषाप्रवाहातली निसटती रूपं संग्रहित केली जातात. त्यातूनच भाषा प्रमाणीकृत होते.

भाषा जसं रूप धारण करते, तसं तिचं प्रतिबिंब कोशात उमटतं. म्हणूनच एकभाषा-कोशाच्या अवलोकनावरून एखाद्या भाषेच्या विकासाचा दर्जा ठरवता येतो. किंबहुना फक्त विकसित भाषांमधेच एकभाषाकोशाची निर्मिती होऊ शकते.

कोशनिर्मिती हे एक अविरत चालणारं कार्य आहे. समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत भाषाव्यवहार शक्य व्हावा, म्हणून मुबलक शब्दसंपत्ती निर्माण होऊन, ती रुळून, तिचं प्रमाणीकरण होण्यासाठी कोशरचनेचं काम संस्थात्मक पद्धतीने आणि सातत्याने चालू राहणं आवश्यक आहे. कोशकारितेचं भाषाविकासातील अनन्यसाधारण महत्त्व भारतीय प्रादेशिक भाषांच्या संदर्भात आपण लक्षातच घेतलेलं दिसत नाही.

या संदर्भात आपण जर्मन भाषेच्या विकासातल्या टप्प्यांचं निरीक्षण करू. तिच्या विकासासाठी दोन शतकांपूर्वीच कसे जाणीवपूर्वक प्रयत्न केले गेले, याचं उदाहरण विचारात घेता येईल.

पण याचबरोबर ' स्वभाषाविकास ' म्हणजे परभाषांचा अव्हेर किंवा दुस्वास नाही, हेही लक्षात घेतले पाहिजे. इथे प्रसिद्ध कोशकार नोआ वेब्स्टर याने घातलेल्या ' संकलनाच्या आणि विभाजना 'च्या तत्त्वाचा उल्लेख करता येईल. अमेरिकन भाषेच्या प्रमाणीकरणासाठी वेब्स्टरनं कोशाचं माध्यम वापरलं, तेव्हा त्यानं फक्त अमेरिकन वाङ्मयीन नमुन्यांवरून शब्दसूची तयार केली आणि ब्रिटिश नमुन्यांचा अव्हेर केला. हे विभाजनाचं तत्त्व आणि भाषाशुद्धीकरणाचा दुराग्रह भाषाविकासाला मारक ठरेल, हे मराठी-कोकणी किंवा हिंदी-उर्दूच्या उदाहरणांवरून स्पष्ट करता येईल.

आपल्या भाषेच्या आणि अनुषंगाने समाजाच्या विकासासाठी इतर भाषांविषयी सहिष्णुवृत्ती वाढवली पाहिजे. आज भारतात जो भाषिक अतिरेकाचा उद्रेक झालेला दिसतो, तो आपल्या भाषिक न्यूनगंडाचंच द्योतक आहे, आणि तो आपल्या मातृभाषेच्या हेळसांडीतून उद्भवला आहे.

मला वाटतं, भारतातली, विशेषतः महाराष्ट्रातली आजची तरुण पिढी ही मातृभाषा हरवलेली पिढी आहे. त्यातून त्यांच्या मनात एक अनामिक असुरक्षिततेची भावना घर करून बसली आहे. आत्मविश्वास वाढवण्यासाठी आस्थेने आणि ठामपणे मातृभाषेचा वापर करणं आवश्यक आहे...

' जर्मन विद्यापीठांमधे वैज्ञानिक क्षेत्रात असलेली लॅटिनची मक्तेदारी हळूहळू कमी होऊ लागली. तिचं स्थान आता जर्मन भाषा घेऊ लागली, कारण या काळात जर्मनमधे प्रचंड प्रमाणावर वैज्ञानिक परिभाषा–कोशांची निर्मिती झाली. त्यामुळे विज्ञानविषयक व तंत्रविद्याविषयक प्रमाणित पारिभाषिक जर्मन प्रतिशब्द रुळले. मुख्यतः भाषावैज्ञानिक आणि कोशकार यांनी अशा रीतीने एकोणिसाव्या शतकात जर्मन भाषेच्या भावी उत्कर्षासाठी भरभक्कम चौकट निर्माण केली...

' मातृभाषेत सर्जनशील, विद्वत्तापूर्ण, किंवा वृत्तपत्तीय अशा कोणत्याही स्वरूपाचं लिखाण करण्यासाठी आवश्यक अशी एकभाषाकोशाची परंपरा भारतीय भाषांमधे अभावानेच आढळते. द्विभाषाकोश किंवा बहुभाषाकोश किंवा विशेष शब्दसूचींची रचना याची एक सातत्यपूर्ण परंपरा अमुक एका भारतीय भाषेत निर्माण झाली आहे, असं कोणत्याही भारतीय भाषेबाबत अभिमानाने म्हणता येणार नाही. फक्त काही तुरळक आणि खाजगी धंदेवाईक स्वरूपाचे प्रयत्न काय ते याला अपवाद आहेत.

' भारतीय समाज हा एक बहुरंगी, बहुढंगी, आणि बहुभाषिक समाज आहे. अशा समाजात कोशांसारख्या साधनांच्या भक्कम आधाराची बोली आणि लेखी भाषाव्यवहारासाठी गरज आहे. त्यासाठी काही सर्जनशील लेखक आणि पत्रकार यांनी वापरलेली आणि त्या त्या प्रसंगी तात्पुरती तयार केलेली परिभाषा पुरेशी ठरत नाही...

" भारतातील इंग्रजी माध्यमांच्या शाळांमधे बालवर्गासाठीही पॉकेट ऑक्सफर्ड डिक्शनरी संदर्भग्रंथ म्हणून नेमली जाते. पण प्रादेशिक भाषांच्या शाळात मात्र मुलं भाषेच्या





अनुक्रमणिका

तासाला असे संदर्भग्रंथ वापरताना दिसत नाहीत. अशा तऱ्हेचे एकभाषाकोश हिंदीत किंवा अन्य कोणत्याही भारतीय भाषांमधे उपलब्धच नाहीत. 'मला कधीच मराठी मराठी शब्दकोशाची गरज पडत नाही,' असं मोठ्या अभिमानाने सांगणारे मराठी लेखक भेटले आहेत. ते म्हणतात, 'काहीही झालं, तरी मराठी माझी मातृभाषा आहे. मग मला कशाला कोश लागेल ?' कोणत्याही प्रांतिक भाषेच्या वृत्तपत्राच्या कचेरीत किंवा कोणाही पत्रकाराच्या हाताशी स्वतःजवळ असा एकभाषाकोश कधीच नसतो. अगदी आजसुद्धा बऱ्याच भारतीय भाषा वैयक्तिक पातळीवर स्वतंत्रपणे नियंत्रित केल्या जातात.

"जर्मनीमधे मुलांना इतर पाठ्यपुस्तकाबरोबरच जर्मन भाषेचा एकभाषाकोश एक महत्त्वाचं शैक्षणिक साधन म्हणून पुरवला जातो. मुलांना पहिल्यापासूनच कोशात शब्द बघायची सवय लावली जाते. त्यामुळे शब्द वापरताना अर्थाविषयी संदिग्धता रहात नाही. भाषाविकासासाठी शब्दार्थाचं प्रमाणित प्रयोजन शाळेच्या चाकोरीतूनच केलं जातं. एकभाषाकोश अशा रीतीने मातृभाषेतील प्रमाणित रूपं कळवण्याच्या कामी आपली भूमिका बजावतो...

"बहुतेक सर्व युरोपीय भाषांमधे एकोणिसाव्या शतकात शासनाच्या मदतीने किंवा मदतीशिवायही कोशरचनेचे प्रकल्प हाती घेतले गेले. या कामात मनापासून रस घेऊन कोशकार आणि भाषावैज्ञानिकांनी शास्त्रीयदृष्ट्या महत्त्वाचं सहकार्य केलं. इथं उदाहरणादाखल जर्मन भाषेचा उल्लेख करता येईल.

"जर्मन भाषेला सतराव्या शतकात एका न्यूनभावानं पछाडलेलं होतं. आपल्याला अस्खलित फ्रेंच बोलता येतं याचीच जर्मन खानदानी मंडळी त्यावेळी प्रौढी मिरवायची. असं म्हणतात, की प्रशियाचा राजा फ्रेडरिक महान याच्यावर फ्रेंच संस्कृतीचा इतका पगडा होता, की त्याने फ्रेंच ही जवळजवळ जर्मनीची राजभाषाच करून टाकली होती ! पण अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकात जर्मन लेखक आणि कवी, भाषावैज्ञानिक आणि कोशकार यांनी फार मोठी जोखीम वाहून अगदी प्राचीनकाळापासूनचं जर्मन भाषेचं वैभव आणि वाङ्मयसंपत्ती संग्रहित आणि ग्रथित करून ठेवली; कोश, ज्ञानकोश आणि इतर संदर्भग्रंथ संपादित करून अनेकविध परकीय भाषांतून तसंच संस्कृतमधूनही मोठ्या प्रमाणात भाषांतरं करून स्वभाषा समृद्ध केली. अशा रीतीने जर्मन पंडित आणि विद्वानांनी सर्वसामान्य जनतेचा आपल्या भाषेविषयीचा विश्वास आणि स्वाभिमान पुनःप्रस्थापित केला. या प्रयत्नांमधून जर्मन वाङ्मय रचनेसाठी त्यांनी प्रचंड शब्दसंपत्तीचा भक्कम पाया घातला. त्यामुळे भाषा व्यवहाराच्या कोणत्याही क्षेत्रात जर्मन भाषेतून लेखन करण्याची सोय झाली.

"प्रगत देशात शब्दकोश हे प्रमाणभाषेचं प्रतीकच मानले जातात. आजची भारतातल्या भाषांची परिस्थिती ही काहीशी एकोणिसाव्या शतकातल्या अमेरिकेसारखी आहे. म्हणजे कमालीची वांशिक भिन्नता, औपचारिक शिक्षणाची उणीव आणि प्रमाणित भाषा-

व्यवहाराची निकड. कोकणी भाषेचं उदाहरण घ्यायचं झालं, तर शुद्धलेखन, उच्चारण, आणि शब्दांमधले भेद लक्षात घेता कोकणीच्या बोली आणि लेखी वापरासाठी विशेष मार्गदर्शक ठरेल अशा संदर्भ ग्रंथाची गरज आहे. ज्याच्या प्रामाण्याविषयी साशंकता असणार नाही असा संदर्भग्रंथ कोकणीभाषकाला खूपच उपयोगी ठरेल. जर्मनमधे 'सीब्ज' म्हणून एक उच्चारण कोश आहे. त्याचं प्रामाण्य सर्वमान्य आहे. रेडिओ आणि दूरदर्शनवर बातम्या देणारांसाठी आणि निवेदकांसाठी, तसंच नटांसाठी हा कोश अधिकृत संदर्भग्रंथ म्हणून वापरला जातो. भारतात आकाशवाणी किंवा दूरदर्शनकडे अशा तऱ्हेचा उच्चारकोश असल्याचं ऐकिवात नाही. खरं तर एकाही भारतीय एकभाषाकोशात योग्य व प्रमाणित उच्चारांबद्दल काहीही माहितीच पुरवलेली नसते...

" भारतातील कोशकारितेत दिसणारा एक सुप्त प्रवाह म्हणजे विभाजनाच्या तत्त्वाचा. (नोआ वेब्स्टरच्या अमेरिकन भाषेच्या कोशात दिसतो तसा.) अलिकडचे हिंदी कोशकार, विशेषतः शासकीय संस्थांसाठी काम करणारे कोशकार हिंदीच्या शुद्धीकरणाच्या भरात' —आणि विशेषतः हिंदी उर्दूपासून वेगळी उठून दिसावी म्हणून— चांगल्या रुळलेल्या हिंदुस्तानी शब्दांचं 'तग' काढून टाकतात, कारण हे शब्द मूळ फार्सी किंवा अरबी असतात!

" या भाषेच्या शुद्धीकरणाच्या संदर्भात मला मान्यवर नट बलराज सहानी यांच्या मार्मिक भाष्याची आठवण होत आहे. त्यांना माझ्या जवाहरलाल नेहरू विद्यापीठाने १९७२ मध्ये दीक्षांत समारंभात भाषण देण्यासाठी बोलावलं होतं. एका सिनेमा नटाला-- आणि तेही हिंदी सिनेसृष्टीतल्या विद्यापीठाच्या श्रोतृवर्गाला संबोधित करण्यासाठी बोलवावं, यांचं पुष्कळ रूढिप्रिय लोकांना खूपच आश्चर्य वाटलं. आपल्या खुमासदार भाषणात बलराज सहानींनी आपल्या शिक्षणातल्या, सामाजिक प्रवृत्तीमधल्या आणि भाषाव्यवहारातल्या विसंगती स्पष्टपणे दाखवून दिल्या.

" हिंदी आणि उर्दूला अनुक्रमे पाकिस्तानात आणि भारतात मिळणाऱ्या वागणुकीबद्दल ते म्हणाले, " पाकिस्तान रेडिओ उर्दूमधे शक्य तेवढे जास्त फार्सी आणि अरबी शब्द घालून तिचं सौंदर्य नष्ट करतो आणि ऑल इंडिया रेडिओ हिंदीमधे संपूर्ण संस्कृत कोश कोंबून तिला बेढब करतो. माझा चित्रपट क्षेत्रातला मित्र जॉनी वॉकर एकदा गमतीने म्हणाला, की निवेदकाने 'अब हिंदी में समाचार सुनिये' असं म्हणण्याऐवजी 'अब समाचारों में हिन्दी सुनिये', असं म्हटलं तर बरं होईल." (बलराज सहानी, १९७२ : पृ. ९)...

" भारतीय संस्कृती ही एक संमिश्र संस्कृती आहे. तिच्या बांधणीतील विविधता हीच तिची खरी शक्ती आहे. तिला तिचा मोठा इतिहास आहे. आपले कोशकार अर्वाचीन भाषांबाबत हा महत्त्वाचा मुद्दा लक्षातच घेत नाहीत, की भाषेमध्ये सांस्कृतिक संदर्भांची जी भर पडते, तिची मुळं ही इतिहासात रुजलेली असतात. " भाषेतील सांस्कृतिक

आधानाचा हा भाग म्हणजे एतद्देशीय सुसंस्कृत भाषिक प्रज्ञेचा आणि मोठ्या सुविद्य भाषिक समाजाचा निर्देशक बनतो." (गॅलार्डो १९८१ : पृ. ६१) अशा स्थितीमध्ये भाषा व्यक्तिगत नियंत्रणातून मुक्त होते. मराठीच्या समृद्धीचं रहस्य यातच आहे.

मी जरा आणखी पुढे जाऊन टीका करण्याचं स्वातंत्र्य घेतो. कोकणीला मराठीहून वेगळं असं स्वतंत्र भाषिक अस्तित्व आहे, असं दाखवून देण्याची राजकीय आणि शास्त्रीय पातळीवरची धडपड चाललेली दिसते. पण निव्वळ 'शुद्ध' कोकणीचं अस्तित्व सिद्ध करण्यासाठी मराठी मूळ असलेल्या सगळ्या शब्दांचं 'तण' कोकणीच्या कोशातून काढून टाकणं, ही मोठी चूक ठरेल. या दोन्ही भाषा शतकानुशतकं एकत्र नांदल्या आहेत. त्यांना समाईक इतिहास आहे. या दोन भाषांमधे हृद्य देवाणघेवाण झालेली आहे.

"एका विशिष्ट ऐतिहासिक संदर्भातच भाषा साकारते. विशिष्ट ऐतिहासिक संदर्भात शब्दाला आनुषंगिक भावार्थाची जोड मिळत जाते. कोणत्याही प्रमाणभाषेची समृद्धी ही तिच्यातील शब्दांच्या नवीन अर्थच्छटा धारण करण्याच्या क्षमतेवर अवलंबून असते. अशा शब्दाचं त्या भाषासमाजाला आपल्या समाईक सांस्कृतिक भूतकाळातल्या अनुभवांशी नातं जोडता यायला पाहिजे. आणि हेच भाषेच्या एकीकरणाचं आणि सहभागाचं कार्य होय. शब्द म्हणजे काही केवळ एक कोशगत पद नाही. एखाद्या सर्जनशील लेखकाच्या दृष्टीने शब्द म्हणजे एक सांस्कृतिक ठेवाच आहे. आणि त्यात सबंध समाजाचा सहभाग असतो. समाजाचा सगळा अनुभव या शब्दात सामावलेला असतो. विशिष्ट संदर्भात तो शब्द वापरला असता समाजाला पुनःप्रत्ययाचा अनुभव येतो, इतिहासाला उजाळा मिळतो. अनुभव अंगीकारण्यात सुसंबद्धता येते. वाङ्मयवाचनातून प्रत्येक माणसाला या सामाजिक सहभागाचा अनुभव मिळतो. माणसाच्या भूतकाळातील आणि वर्तमानातील सर्व अनुभव क्षेत्रात सहभागी होणं, हे तर वाङ्मयाचं आणि भाषेचं सर्वात महत्त्वाचं कार्य आहे.

"कोशांमुळे हे सहभागाचं कार्य सुकर होतं. सामाजिक भाषाव्यवहाराच्या प्रवाहित्वामुळे एरवी विस्मरणात लुप्त झाला असता असा जो भाषेच्या इतिहासाचा भाग असतो त्याचे कोश जतन करतात...

"कोशरचना करणं ही खरोखर पाहता एक शास्त्रीय कामगिरी आहे. पण डॉ. अशोक केळकर म्हणतात (१९८० : पृ. २३१) त्याप्रमाणे, भारतात आधुनिक भाषावैज्ञानिक अभ्यासाची सुरवात या शतकाच्या पाचव्या दशकातच झाली असली तरीही कोशासारख्या महत्त्वाकांक्षी प्रकल्पामध्ये भाषाविज्ञानात प्रशिक्षित अशा लोकांची भरती क्वचितच केली जाते...

"आतापर्यंत शासकीय किंवा खाजगी संस्थांनी सामाजिक आणि वैयक्तिक भाषाव्यवहाराच्या निरनिराळ्या क्षेत्रात प्रांतिक भाषेच्या विकासासाठी केलेल्या प्रयत्नांना किती यश आलं आहे, याची खात्री करून घेतली पाहिजे. तसंच त्या त्या प्रांतातले लोक स्वभाषा वापरण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न करतात का, प्रांतिक भाषा हे माध्यम असलेल्या





अनुक्रमणिका

शाळांमध्ये आपल्या मुलांना घालायला पालकांना आवडेल का, प्रांतिक भाषेतील शास्त्रीय विषयांवरील पुस्तकांच्या निर्मितीचं प्रमाण वाढलं आहे का, आणि उच्चशिक्षण प्रांतिक भाषेतून घेण्याचं प्रमाण वाढलं आहे का, हेही सर्वेक्षणाद्वारे ठरवता येईल. तसंच भारतीय भाषांतील वर्तमानपत्रं, मासिकं, आणि इतर नियतकालिकं यांचा खप वाढला आहे का, सर्वसामान्य भारतीय लोक वापरत असलेल्या भाषेवर इंग्रजीचा पगडा किती आहे, प्रांतिक भाषेतील चित्रपटांच्या संख्येत वाढ झाली आहे का, आणि प्रसार माध्यमातील विज्ञापनात अजूनही त्याच प्रमाणात इंग्रजी शब्द वापरले जातात का, हे ही पाहिले पाहिजे. या पाहणी-वरून प्रांतिक भाषांबाबत समाजाच्या प्रतिसादात आणि प्रवृत्तीत काय बदल झाले आहेत, ते दिसून येईल.

"शहरी भागात इंग्रजीचा प्रभाव कमी झालेला नाही हे नक्की. एके काळी प्रांतिक भाषामाध्यम असलेल्या अनेक शाळांतून प्रांतिक भाषा माध्यम म्हणून काढून टाकल्या आहेत. किंवा या शाळांमधे नवीन इंग्रजी माध्यमही सुरू केलं आहे. या सर्वांची पहाणी केली पाहिजे. जोपर्यंत वरील निकषांना धरून पायाभूत शब्दांच्या याद्या तयार केल्या जात नाहीत तोपर्यंत कोणताही उपयुक्त शब्दकोश– एकभाषी किंवा द्विभाषी– निर्माण होणं शक्य नाही.

"कोशरचनेतून भाषाविकासासाठी चौकट तयार केली जाते. भारतात मात्र याला दुर्दैवाने विद्वानांकडून विशेष मान्यता मिळालेली नाही आणि शासन किंवा खाजगी संस्थां-कडूनही अभावानेच मदत मिळाली आहे. कारंतांसारखा विद्वान माणूसही आपल्या 'कोश-रचना' या विषयांवरील व्याख्यानात सॅम्युएल जॉन्सनच्या व्याख्येवर शिक्कामोर्तब करून कोशकाराला 'निरुपद्रवी भारवाहक' ( harmless drudge ) म्हणतो आणि वर कोश-रचनेच्या कार्यात रत असलेले लोकही स्वतः 'भारवाहक' ही उपाधी मान्य करतील, असं म्हणतो !

"पण सरतेशेवटी हे 'भार वाहण्याचं' कामच फक्त कोशकारितेच्या संस्थापक बांधणीचा मजबूत पाया घालू शकेल. यासाठी पिढ्यान्‌पिढ्या शांतपणे, चिकाटीने आणि सातत्याने काम करणं आवश्यक आहे. हे शासकीय यंत्रणेतून किंवा घोषणा देऊन आणि दगडफेक करून साधणार नाही तर मनापासून काम करणाऱ्या व्यावसायिक भाषावैज्ञा-निकांच्या अनेक पिढ्यांनी अत्यंत सखोल आणि पद्धतशीर काम केल्याने हे साधणार आहे. प्रांतीय विद्यापीठे आणि प्रांतिक भाषा संचालनालय यांच्या संलग्न प्रयत्नांतून हे काम म्हणजे शैक्षणिक संशोधन कार्याचा भाग बनलं पाहिजे. जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रातून माहिती आणि सामग्री गोळा करणाऱ्या एखाद्या सांख्यिकी संस्थेसारखी कोशरचना करणारी संस्था ही कायमस्वरूपी संस्था राहिली पाहिजे. जर भारतीय भाषांची उन्नती साधायची असेल, तर प्रत्येक भारतीय भाषेसाठी स्वायत्त कोशरचना संस्था स्थापली पाहिजे. तिने प्रमाणित कोशासाठी लागणारी सामग्री गोळा केली पाहिजे. याचा उपयोग शाळा-कॉलेज-

मवे, कवी, लेखक, पत्रकारांना आणि अधिकाधिक साक्षर होणाऱ्या प्रांतिक समाजाला जरूर होईल. अनेक शतकांपासून अविरत कार्य करत असलेल्या आकादेमी फ्रांसेजच्या धरतीवर कोशरचना संस्थांनी काम करावं अशा चिवट प्रयत्नांमधूनच भाषिक गटबाजी जाऊन खरंखुरं मातृभाषा-प्रेम, इतर भाषांविषयी सहिष्णुता, आणि विदेशी भाषांकडे मोकळ्या मनाने बघण्याची वृत्ती वाढेल. ”

### संदर्भ :


कत्रे सुमित्र मंगेश १९८० Current trends in Indian lexicograpnhy. समावेशः एल. झगुस्ता, संपादक १९८०.

कारंत एम्. व्ही. १९८६ लेख. The Times of India, Sunday review, १७ ऑगस्ट.

केळकर अशोक रा. १९८० Dictionaries of Modern Indian languages : assessment and recommendations. समावेश : मिश्र, संपादक १९८० : पृ. २२८-३४.

गॅलार्डो ए. १९८० Dictionaries and the standardization process समावेश झगुस्ता १९८०.

झगुस्ता एल्., संपादक १९८० Theory and method in lexicography. हॉर्नबीम प्रेस.

पट्टनायक देवीप्रसन्न १९८० प्रस्तावना. समावेश : मिश्र, संपादक १९८०.

मिश्र बालगोविंद, संपादक १९८०. Lexicography in India. मैसूर : भारतीय भाषा संस्थान.

सहानी बलराज, १९७२ दीक्षांत समारोह अभिभाषण, जवाहरलाल नेहरू विद्यापीठ, नवी दिल्ली, १६ नोव्हें. पुस्तिका.



मूळ प्रकाशन : Development of language : The Role of lexicographers **Jawaharlal Nehru University news,** November 1986, p. 8-12.

अनुवाद : नीति बडवे, आधुनिक युरोपीय भाषा व जपानी भाषा विभाग, पुणे विद्यापीठ, रानडे इन्स्टिट्यूट, पुणे ४११ ००४.







अनुक्रमणिका

# मराठीचा पुनर्रचित अभ्यासक्रम
## पाचवी ते आठवीसाठी व्याकरण इत्यादी

द. न. गोखले

पंतप्रधान राजीव गांधींच्या नेतृत्वाखालील केंद्रशासनाने नवे राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६ साली जाहीर केले आणि त्याची अंमलबजावणी करण्यासाठी राज्य सरकारांची हालचाल लगबगीने सुरू झाली. आपल्या महाराष्ट्र राज्याने '**पुनर्-र्रचित अभ्यासक्रमाचा मसुदा**' १९८७ साली प्रसिद्ध केला आहे आणि त्यावर सूचना मागविल्या आहेत. या मसुद्याच्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे, राष्ट्रीय शैक्षणिक धोरण आणि तोवर उपलब्ध असलेली अनेक प्रकारची सामग्री विचारात घेऊन राज्यसरकारच्या प्रयत्नाने हा मसुदा तयार झाला. त्यात राज्य सरकारचे अनेक अधिकारी, निमंत्रित विषयतज्ज्ञ वगैरेंच्या कार्यगटांचा महत्त्वाचा सहभाग आहे. दि. ३ एप्रिल व दि. २८, २९ जुलै १९८७ रोजी शासन–नियुक्त सदस्य आणि निमंत्रित शिक्षणतज्ज्ञ यांच्या एका सभेत या मसुद्याला अंतिम रूप दिले गेले. आता महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषदेचे संचालक श्री. व. रा. नागपुरे यांनी त्याचे प्रकाशन केले आहे.

या मसुद्यावर सूचना मागविलेल्या असल्या, तरी त्याच्या प्रस्तावनेत सूचना पाठविण्याचा अंतिम दिनांक दिलेला नाही. सूचनांचा विचार करून, मसुद्यात योग्य ते फेरफार करून, तो 'शासनाकडे मंजुरीसाठी पाठविला जाईल', असे तेथे मोघम म्हटलेले आहे. 'मर्यादित वितरणासाठी' प्रसिद्ध झालेला हा मसुदा नुकताच योगा-योगाने प्रस्तुत लेखकाच्या हाती पडला. तेव्हा त्याची ही समीक्षा कालबाह्य ठरणार नाही, ही आशा.

कोणताही अभ्यासक्रम विशिष्ट शैक्षणिक धोरणाच्या, आकृतिबंधाच्या नि संघटनेच्या चौकटीतच ठरत असतो. तेव्हा प्रस्तुत अभ्यासक्रमाची चौकट प्रथम संक्षेपाने तरी बघितली पाहिजे. राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाची चर्चा आजवर वृत्त-पत्रांतून पुष्कळ झाली आहे. तेव्हा येथे त्याच्या परिचयाची विशेष आवश्यकता नाही. देशभर शिक्षणाच्या व्यवस्थेत सुसूत्रता यावी, अभ्यास जीवनाभिमुख असावा, त्यातून योग्य ते मनुष्यबळ तयार व्हावे, प्राथमिक शिक्षण स्वयंपूर्ण असावे, ते सार्वत्रिक असावे, अभ्यासक्रम 'शिक्षक–केंद्रित' असण्यापेक्षा 'विद्यार्थी–केंद्रित' असावा, थोडक्यात, एकविसाव्या शतकाला सामोरे जाण्याची क्षमता आपल्या अंगी यावी, वगैरे उद्दिष्टे नव्या राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाने स्वतःपुढे ठेवली आहेत,





अनुक्रमणिका

हे आपल्याला ठाऊक आहे. नवा अभ्यासक्रम इयत्ता १–५ यांचा कनिष्ठ प्राथमिक स्तर आणि ६ ते ८ या इयत्तांचा वरिष्ठ प्राथमिक स्तर मानतो; आणि ८+२+२ असा आकृतिबंध आपल्या डोळ्यांसमोर ठेवतो. म्हणजेच आता ४ थीऐवजी ५ वी अखेर नि ७ वीऐवजी ८ वी अखेर शिक्षणाचा पहिला नि दुसरा टप्पा पुरा होईल.

महाराष्ट्राचा शैक्षणिक आकृतिबंध अखिल भारताशीं सुसंगत राहणार असला, तरी इंग्रजी व हिंदी यांच्या शिक्षणात महाराष्ट्र आपला मोठेपणा जपणार आहे. इतर राज्यांत या दोन भाषांचे शिक्षण ६ वी पासून सुरू होईल, तर महाराष्ट्रात ते ५ वी पासून सुरू होईल.

एकूण ४५ तासिकांपैकी १५ तासिका ३ भाषांच्या वाटचाला येतील, (म्हणजे मातृभाषेच्या वा मराठीच्या वाटचाला सुमारे ५ तासिका येतील), असे पृष्ठ ४ वर म्हटले आहे. मात्र 'मातृभाषेच्या अध्यापनासाठी एकूण ३० मिनिटांच्या १३ तासिका एका आठवडयात असतील', असे पृष्ठ १४ वर सांगितलेले आहे. प्रस्तुत पुस्तिकेमधला अभ्यासक्रम ३ भाषांना १५ तासिकांप्रमाणे आखला आहे, की मातृभाषेला ३० मिनिटांच्या १३ तासिकांप्रमाणे आखला आहे, ते समजत नाही. १५/३ नि १३ तासिकांचा मेळ कसा बसतो, ते कळत नाही.

'व्याकरणाचे पुस्तक वेगळे न काढता पाठ्यपुस्तकाबरोबर तो भाग जोडलेला असावा', असा आदेश पृष्ठ १४ वर दिला असून, त्याच पृष्ठावर ५ वीच्या पाठ्यपुस्तकातील 'गद्य व कविता' ६४ पृष्ठे; ६ वी नि ७ वीच्या पाठ्यपुस्तकातील ७२ पृष्ठे आणि ८ वीच्या पाठ्यपुस्तकातील ८० पृष्ठे असेल, असें म्हटले आहे. व्याकरणासाठी किती पृष्ठे, याचा उल्लेख नाही. मात्र, पृष्ठांच्या आकाराचा तेथे उल्लेख नाही. (टंकाच्या आकाराचा निर्देश नसावा, हे साहजिक होय.)

या मसुद्यात १ ली ते ३ रीच्या अभ्यासक्रमात व्याकरणाचा वेगळा भाग नाहीं. ४ थी ते ८ वीच्या अभ्यासक्रमात तसा भाग आहे. याचा अर्थ, ४ थी पूर्वी व्याकरण नाही, असा मात्र नाही. उदाहरणार्थ, ३ रीच्या अभ्यासक्रमात, विद्यार्थी 'पाठ्यपुस्तकातील नाम, विशेषण, क्रियापद ओळखून लिहितो', असा उल्लेख आहे. (पृष्ठ २२). येथे आपण ५ वी ते ८ वीच्या व्याकरणादिक भाषिक अभ्यासाचा मुख्यत: विचार करणार आहोत. त्यात १ ली ते ४ थीच्या अभ्यासाचाही थोडा उल्लेख येईल.

या सर्वच मसुद्यात अध्यापनशास्त्र नि मराठी विषय यांच्या अत्याधुनिक ज्ञानाची नि तंत्राची, त्यांच्या अज्ञानाशी किंवा शैथिल्याशी मोठी चमत्कारिक भेसळ झालेली आहे ! एकीकडे अभ्यासक्रमाची इयत्तावार मांडणी करताना ती आधुनिक पद्धतीने 'अध्यापनाची निष्पत्ती' आणि 'उपक्रम' यांच्या कोष्टकात बसविली आहे;

'व्याकरण शिकवताना व्याख्येवर भर देऊ नये', अशी रास्त सूचना दिली आहे (पृष्ठ २९); अभ्यासक्रमात शब्दकोशच नव्हे, तर ज्ञानकोश, बालज्ञानकोश, इत्यादी महाकोशही आणले आहेत (पृष्ठ ३८). तर दुसरीकडे, उद्देश्यला उद्देश म्हटले आहे (पृष्ठ २५, ४२); वृत्तांत 'पादानुकूलक' नावाच्या अज्ञात वृत्ताचा निर्देश केला आहे (पृष्ठ ४२); नव्या शुद्धलेखनात नसलेल्या 'परसवर्णाने दाखविल्या जाणाऱ्या' अनुस्वारांचा उल्लेख उगाच केला आहे (पृष्ठ ३२); वाक्यांच्या प्रकारात स्वार्थी, प्रश्नार्थी, आज्ञार्थी वगैरे प्रकारांप्रमाणे केवल, मिश्र, संयुक्त हे प्रकारही येतात, याविषयी अज्ञान दाखविले आहे (पृष्ठ ३२, ३८); 'वाक्यातील शब्दांचे व्याकरण' सांगणे हा बी. ए. च्या विद्यार्थ्यांनाही अवघड वाटणारा विषय कोणतीही मर्यादा न घालता, इयत्ता ७ वीला घातला आहे (पृष्ठ ३८); आणि इयत्ता ४ थी व ६ वीसाठी एक 'क्षमता' अशी दिली आहे, की 'भाषिक वैशिष्टये व भाषेची शास्त्रीय बैठक समजावून घेऊन त्यानुसार भाषेचा वापर करणे.' (पृष्ठ २५, ३२) ! – खरोखर अगडबंब शब्दांखेरीज या 'क्षमते'मध्ये काहीतरी हाती लागते काय ? 'भाषेची वैशिष्टये' काय, नि 'भाषेची शास्त्रीय बैठक' काय ! ती 'समजावून घेऊन' 'भाषेचा वापर' कसा करायचा ? विद्यार्थ्यांत राहो; पण शिक्षकांत तरी ही 'क्षमता' असते काय ?

या मसुद्यात वारंवार व्याकरणाचा आणि शुद्धलेखनाचा प्रत्यक्ष किंवा पर्यायाने उल्लेख झाला आहे. शुद्धलेखनाचे 'मराठी साहित्य महामंडळा'चे नियम शासनाने मान्य केलेले असल्यामुळे तेच नियम या मसुद्यात अभिप्रेत आहेत, असे समजता येईल. पण व्याकरणाचें काय ? दादोबांपासून गोडबोले, चिपळूणकर, जोशी, दामले राजवाडे, ग. ह. केळकर, मंगरूळकर वगैरे अनेक व्याकरणकार अर्वाचीन काळात होऊन गेले. त्यांच्यामध्ये भरपूर मतभेद आहेत. व्याकरणाच्या एकेका अंगावरही त्यांचे ऐकमत्य नाही हे जाणकारांना माहीत आहे. अशा स्थितीत अभ्यासक्रम आखताना प्रमाण धरलेल्या व्याकरणाचा निर्देश करायला नको काय ? निदान अभ्यासक्रमाच्या कोणत्या भागासाठी कोणते व्याकरण प्रमाण मानले आहे, ते सांगायला नको काय ? त्याशिवाय अभ्यासक्रम कार्यान्वित कसा करता येईल ? बरे, व्याकरणावर पुस्तक असणार नाही, असेही हा मसुदा सांगून बसला आहे. मग पाठ्यपुस्तकात जर काही विवेचन आलेच, तर तेवढ्यावर भागेल काय ? शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका काढण्याचा विचार आहे. तीमध्ये तरी यासंबंधी सविस्तर खुलासा आला पाहिजे.

५ वीच्या अभ्यासक्रमात विद्यार्थ्याने कर्ता, कर्म, क्रियापद ही ओळखावी, अशी अपेक्षा आहे (पृष्ठ २९); ७ वीच्या अभ्यासक्रमात प्रयोगांचा उल्लेख आहे, (पृष्ठ ३८); आणि ७ वीच्या अभ्यासक्रमात 'अर्थ' आले आहेत (पृष्ठ ३८)

पण कर्ता, प्रयोग, अर्थ वगैरेंबाबत दादोबा, जोशी, खेर, दामले वगैरे व्याकरण-कारांत काही मतभेद आहेत, हे जाणकारांना ठाऊक आहे. यासाठीच कोणता व्याकरणकार आपण कोठे प्रमाण मानला आहे, हे अभ्यासक्रमाने सरळ सांगितले पाहिजे, असे वर म्हटले. दादोबा, जोशी, खेर, दामले वगैरे व्याकरणकारांच्या मूलभूत मतभिन्नतेकडे डोळेझाक करून ती बिचाऱ्या प्राथमिक शिक्षकांच्या, माध्य-मिक शिक्षकांच्या, (किंवा सामान्य शालेय व्याकरणकारांच्या) पदरात घालणे हा दंभ होय. या व्याकरणकारांची मतभिन्नता अभ्यासक्रम ठरविणारांना मिटवता येईल, असे येथें सुचवायचे नाही. पण त्यांनी पाठ्यांश तरी स्पष्ट करून शिक्षकांपुढे ठेवला पाहिजे.

'उद्देश' ( = उद्देश्य) आणि 'विधेय' यांचा परिचय ४ थीपासून विद्यार्थ्यांना झाला पाहिजे, (पृष्ठ २५, ४२), असे हा मसुदा म्हणतो. पण वाक्यपृथक्करणाच्या या भागाचा व्याकरणाच्या इतर भागांशी संबंध काय, ते समजत नाही. खरोखर एकीकडे नामे, विशेषणे, क्रियापदे वगैरे शब्दजाती; विभक्ती, आख्यात (काळ, अर्थ) वगैरे विकरणे; कर्ता, कर्म, क्रियापद, प्रयोग वगैरे वाक्यरचना आणि दुसरी-कडे वाक्यपृथक्करण यांचा तसा साक्षात संबंध आहे काय ? इंग्रजी व्याकरणातील ही चीज आपल्याकडें आणण्यास माझा विरोध नाही. पण व्याकरणाच्या अभ्यास-क्रमात ती घालताना तिचा इतर पाठ्यक्रमाशी संबंध काय, ते शिक्षकांना कळले पाहिजे. अधांतरी लोंबकळणारी एखादी सुटी, मोकळी गोष्ट विद्यार्थ्यांच्या डोक्यात भरवली, तर त्यांची तर्कशक्तीच गोंधळून जाण्याचा संभव असतो.

आत्ताच जे उद्देश्य नि विधेय यांविषयी म्हटले, ते एका अर्थी व्याकरणाच्या सर्वच अभ्यासक्रमाविषयी म्हणता येण्यासारखें आहे. 'कार्यात्मक पद्धतीचे व्याकरण शिकविणे' असा आदेश या मसुद्यात दिलेला आहे. (उदा०, पृ. २५). पण कार्या-त्मक पद्धतीने सर्व व्याकरण शिकविता येईल काय ? ८ वी पर्यंत जेवढे व्याकरण अभिप्रेत आहे, तेवढे तरी शिकविता येईल काय ? फंक्शनल ग्रामर (व्यावहारिक व्याकरण) ही कल्पना अकोलकर–पाटणकरांच्या पुस्तकाने महाराष्ट्रीय शालेय जगतात प्रथम ठळकपणे पुढे आली. पण तिचा पुरा पाठपुरावा अद्यापि झालेला नाही. व्याकरणातील कोणता भाग किती व्यवहारोपयोगी आहें, याची झाडून पाहणी झाली पाहिजे. ती अद्यापि झाली नाहीं. हा प्रस्तुत अभ्यासक्रम तयार कर-णाऱ्यांचा दोष नव्हे. ते काम मोठ्या संशोधनाचे, जाणकारांचे नि परिश्रमाचे आहे. पण या लोकांनी 'कार्यात्मक पद्धती' वगैरे शब्द वापरून शिक्षकांना संभ्रमात ढकलणे, फंक्शनल ग्रामरच्या परिसरात हळूच नेऊन पोचवणे, योग्य नव्हे.

सद्यःस्थितीत व्याकरणाचा विशिष्ट पाठ्यांश (तो व्यवहारोपयोगी कितपत आहे, हे न पाहता) शिकविण्यासाठी पुढे ठेवून तो जमेल तेवढा व्यवहाराशी

संलग्न करणे नि ' कार्यात्मक पद्धतीने ' शिकविणे एवढेच शिक्षकांच्या हाती आहे.

ज्ञान नि अज्ञान यांची चमत्कारिक भेसळ प्रस्तुत मसुद्यात झाली आहे, असे वर म्हटले आहे. त्याची प्रचीती व्याकरणाच्या पाठ्यांशाला ज्या मर्यादा घातल्या पाहिजेत, त्यात चांगली येते. ८ वीच्या अभ्यासक्रमात उपमा, उत्प्रेक्षा, यमक एवढेच अलंकार आहेत; सहाच वृत्ते आहेत; प्रमुख तीनच अर्थ उल्लेखिले आहेत; म्हणजे पाठ्यांशाला जाणीवपूर्वक मर्यादा घातल्या आहेत. (पृ. ४२). पण शब्दसिद्धीपुढे उपसर्गघटित, प्रत्ययघटित, समासघटित ' अशी नोंद करून तो पाठ्यांश अमर्याद करून सोडला आहे. इयत्ता ७ वीच्या अभ्यासक्रमात ' वाक्यातील शब्दांचे व्याकरण ' सांगण्याचा जो प्रकार आहे (पृष्ठ ३८) तो असाच अमर्याद आहे, हे पूर्वी सांगितलेच आहे. इयत्ता ७ वीच्या अभ्यासक्रमातच ' विभक्ती व तिचे कार्य ' या विषयाचा समावेश आहे आणि तेथे ' कार्य ' म्हणजे वाक्यातील शब्दांचा संबंध जोडणे ' एवढेच स्थूल कार्य अभिप्रेत नसून ' विभक्तींचे अर्थ ' असे सूक्ष्म कार्य अभिप्रेत आहे, हे ' उपक्रम ' या स्तंभावरून दिसून येते. कारण विद्यार्थ्यांना विभक्तींच्या अर्थाचा ' तक्ता ' करावयाचा आहे. (पृष्ठ ३८). हा पाठ्यांशही अमर्याद म्हटला पाहिजे. दामल्यांच्या व्याकरणातील दुसऱ्या भागातील तिसरा अध्याय नुसता चाळला, तरी हे लक्षात येण्यासारखे आहे.

व्याकरणाचे एखादे मान्य पाठ्यपुस्तक असले, तर त्यावरून निरनिराळ्या इयत्तांत पाठ्यांशाला कोणकोणत्या मर्यादा घालाव्या लागतात, ते समजू शकते. पण प्रस्तुत मसुद्यात व्याकरणाच्या पाठ्यपुस्तकांनाच अर्धचंद्र दिलेला असल्याने गोंधळात भर पडण्याचाच संभव आहे.

कोणत्याही चांगल्या अभ्यासक्रमात पाठ्यांश क्रमशः उलगडत गेला पाहिजे. विद्यार्थ्यांचा विकास आणि पाठ्यांशाचा विकास जोडीने नि पायरीपायरीने होत गेला पाहिजे. प्रस्तुत मसुद्यात पाठ्यांश केव्हा मर्यादित, तर केव्हा अमर्याद ठेवल्याने ती गोष्ट साधलेली नाही, हे येथवर सूचित झाले आहे. त्याची काही प्रत्यक्ष उदाहरणे अशी : या मसुद्याप्रमाणे इयत्ता दुसरीत मुलाला ' पूर्णविराम व प्रश्नचिन्हांचा वापर करता येतो. (पृष्ठ १७), पण इयत्ता तिसरीत तो एकदम ' सर्व ' विरापचिन्हांचा वापर करतो. (पृष्ठ २१). (विरामचिन्हे म्हणजे ' थांबण्याच्या जागा दाखवणाऱ्या खुणा ' असा मर्यादित अर्थ आता राहिलेला नाही. पूर्णविराम, अर्धविराम यांच्यासह प्रश्नचिन्ह नि उद्गारचिन्ह यांचाही समावेश आता विरामचिन्हांत होतो. आणि अवतरण, द्विबिंदू, अपसारण, संयोग इत्यादींचाही लक्षणेने विरामचिन्हांत अंतर्भाव होऊ लागला आहे.) या मसुद्यात ' भाषिक वैशिष्टये व भाषेची शास्त्रीय बैठक समजावून घेऊन भाषेचा वापर करणे ' यापूर्वी उल्लेखिलेल्या या उद्दिष्टाचा उल्लेख ४ थी च्या व्याकरणात शीर्षभागी आहे. इयत्ता ५ वीत

त्याचा लोप झाला आहे. इयत्ता ६ वीत ते पुन्हा शीर्षभागी झळकते ! (पृष्ठे २५, २९, ३२). इयत्ता ७ वी नि ८ वीमध्ये ते गुप्त आहे. व्याकरणाखाली ५ वी – ६ वीमध्ये फक्त उजळणी दिली आहे ! तर ८ वी – ९ वी मध्ये उजळणीचा पत्ताच नाही ! (पृ. २९, ३२, ३८, ४२). 'वाक्यातील शब्दांचे व्याकरण' सांगणे हा व्याकरणातील शीग गाठणारा भाग ७ वीमध्ये आहे. (पृष्ठ ३८). (पूर्वोक्त); पण ८ वीमध्ये त्याचा निर्देशच नाही ! (पृष्ठ ४२). ६ वीमध्ये नि ७ वीमध्येही विरामचिन्हांचा वापर विद्यार्थी करतो (पृष्ठे ३२, ३८) असे म्हटले आहे. म्हणजे ६ वीमध्ये तो जे शिकतो, ते ७ वीमध्ये विसरत नाही, असे आपण समजू या. पण ६ वीमध्ये तो शुद्धलेखनाचे नियम सांगतो' (पृष्ठ ३३) नि ७ वीमध्ये 'शुद्धलेखनाच्या नियमांनुसार विरामचिन्हांचा वापर करून लेखन करतो.' (पृ. ३८) ! यातील उलटा प्रकार अध्यापन जाणणाऱ्या शिक्षकांना सहज समजू शकेल. वापर आधी, नियम नंतर, असा शैक्षणिक क्रम असतो. पण येथे नियम सांगणे आधीच्या इयत्तेत असून काही नियमांनुसार लेखन करणे पुढच्या इयत्तेत आहे ! बरे, ६ व्या इयत्तेत जे 'शुद्धलेखनाचे नियम' मुलांनी सांगावयास पाहिजेत, ते साधेसुधे, सुगम नाहीत. त्यांत 'तत्सम शब्दांतील उपान्त्य इ–उ–ई–ऊ' संबंधी नियम आहेत; 'जोडाक्षरां'चे नियम आहेत; नि 'सामासिक शब्दांतील 'इ' अ '(उ)' यांबद्दलही नियम आहेत. (पृष्ठ ३२). उलट, ७ व्या इयत्तेत ज्या 'शुद्धलेखनाच्या नियमांनुसार' लेखन व्हावयाचे आहे, ते विरामचिन्हांसंबंधी आहेत; सोपे आहेत; नि थोडेफार पूर्वपरिचित आहेत (पृष्ठ ३८). येथे शुद्धलेखनाच्या नियमांचा क्रमवार विकास नाही, चढती भांजणी नाही, तर उतरणी भांजणी आहे !

जाताजाता 'जोडाक्षरां'चे नियम कोठे सापडतील, असा लहानसा प्रश्न विचारावासा वाटतो. असे नियम महामंडळाच्या शुद्धलेखनात दिसत नाहीत.

या पुस्तिकेतील अभ्यासक्रम एका बाबतीत फारच महत्त्वाकांक्षी आहे. ती बाब म्हणजे शब्दकोशाची, ज्ञानकोशाची, वा तशा कोशाची अथवा इतर काही महाकोशांची ! या कोशांचा वापर ७ वी–८ वीमधील प्राथमिक वर्गातील मुलांना करता यावा, अशी ह्या अभ्यासक्रमाची उडी आहे ! वास्तवाच्या संदर्भात अध्यापन करता यावे, म्हणून अभ्यासक्रम आखणारांना वास्तवाचे अचूक भान ठेवावे लागते. त्यासाठीच अमुक विषयाला आठवड्यांच्या तासिका किती, प्रत्येक तासिकेत मिनिटे किती, हे बघावे लागते. खरे म्हणजे, वर्षात कामाचे दिवस किती आणि वर्गात मुले किती, हेही बघितले पाहिजे. पाने किती म्हटल्यावर पानात मजकूर किती मावणार, हेही पाहायला पाहिजे. वास्तवाचे हे अचूक आणि सापेक्ष भान या महत्त्वाकांक्षी अभ्यासक्रमात ठवले नसावे. आमच्या काही प्राथमिक शाळांत अजून

पुरेसे शिक्षक नाहीत, मुलांना निवारा देणाऱ्या इमारती नाहीत, बसायला बाके नाहीत – मुले अर्धपोटी उपाशी आहेत नि त्यांच्या अंगांवर धड कपडा नाही, की जवळ पुस्तके नाहीत! – अशी दीनवाणी अवस्था असताना, बऱ्याच प्राथमिक शाळांत ग्रंथालय नाही, ग्रंथालय असले, तरी त्यात कोशादिक संदर्भग्रंथ नाहीत, हे क्रमप्राप्त होय. आज महाराष्ट्रासारख्या पुरोगामी राज्यातसुद्धा शेकडो प्राथमिक शाळा अशा आढळतील, की जेथे ज्ञानकोश तर नाहीच, पण शब्दकोशही नाही! नुसत्या प्राथमिक शाळा नव्हे, तर अनेक माध्यमिक शाळा आणि महाविद्यालयेही अशी आढळतील, की ज्यांना असल्या कोशांचा स्पर्शही झालेला नाही! मग शब्दकोश, नि महाकोश विद्यार्थ्यांना परिचित व्हावेत, अशी या पुस्तिकेतील अभ्यासक्रमाने केवढीही महत्त्वाकांक्षा धरली, तरी ती पुरी कशी व्हावी? अभ्यासक्रमाने शाळांचा 'अंत्योदय' होईपर्यंत वाट बघावी, असे म्हणायचे नाही. पण त्याने 'सरासरी' वस्तुस्थितीचे तरी भान ठेवले पाहिजे. निदान पुढच्या ४–५ वर्षांत शाळांत कितपत सुधारणा होईल, याचा वास्तव अंदाज घेतला पाहिजे. शाळेत एखादा लहानसा कोश उपलब्ध झालाच, तर वर्गातील ४०–४५ मुलांच्या हाती तो कसा देणार नि त्याचा 'उपयोग' कसा शिकवणार, त्यात हवा तो शब्दार्थ किंवा माहिती शोधावयाचा 'सराव' त्यांच्याकडून कसा करून घेणार (पृष्ठ ३८), याचे चित्र कल्पनेने तरी निर्माण करता आले पाहिजे.

शब्दकोशादिकांची जुजबी तोंडओळख करून देण्यावर या अभ्यासक्रमाचे समाधान नाही. कोशातील 'वर्णक्रम' नि 'संक्षेप–चिन्हे' यांचा 'दृढ' परिचय तो ७ वी–८ वी तील मुलांना करून देणार आहे; 'अगदी कमी वेळात' शब्दकोशात अवघड, अपरिचित शब्द पाहण्याची 'सवय' तो मुलांना लावणार आहे; एवढेच नव्हे, तर 'अनुस्वार नि जोडाक्षर' यांनी ज्यांचा प्रारंभ होतो, असे शब्द कोशात शोधण्याचा 'सराव' त्यांना देणार आहे! शब्दकोशाबरच 'ज्ञानकोश, बालज्ञानकोश इ० काही महाकोशां'ची ओळखही तो मुलांना घडविणार आहे! (पृष्ठ ३८) सारीच शेखमहंमदी – दुसरे काय?

हा लेख थोडासा लांबलाच. पण प्रस्तुत पुस्तिकेतील अभ्यासक्रमाचा मसुदा अंशतः सुधारला गेला, तरी लेख सार्थकी लागेल. (८ सप्टेंबर, १९८८)

**संदर्भ :** राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६ महाराष्ट्र राज्य **पुनर्रचित अभ्यासक्रमाचा मसुदा** प्राथमिक स्तर भाग १ अभ्यासक्रम (आणि) भाग २ प्रथम भाषा, द्वितीय भाषा आणि तृतीय भाषा, पुणे. महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, १९८७.

**रमामंगल, २९ सहवास सहनिवास, कर्वेनगर, पुणे ४११ ०२९.**

# घुसमटलेली मराठी : एक रोगनिदान

## पुष्पा भावे

वस्तुस्थिती अशी दिसते, की स्वातंत्र्यानंतर पुन्हा एकदा स्वदेशीच्या चळवळीची गरज आहे इतकी माणसांच्या मनात परदेशाची ओढ आहे. हे नेमके झाले कसे ? मराठी राजभाषा असणारे महाराष्ट्र राज्य निर्माण झाल्यावर माणसे अधिकाधिक इंग्रजीकडे वळली. ही उलटी गती कशामुळे झाली ?

स्वातंत्र्य मिळाले, तेव्हा अनेकांची चुकीची समजूत अशी होती, की आता सामाजिक–राजकीय कर्तव्याची जाणीव बाळगण्याची गरज नाही. ज्याने त्याने आपला आणि आपल्या कुटुंबीयांचा विकास साधावा. या आत्मकेंद्रित सुखवादी तर्काने ते आजूबाजूच्या परिस्थितीचा विचार करू लागले. तेव्हा लक्षात आले, की या देशात साधनसंपत्ती कमी आहे. त्यामुळे देशातील ऐतिहासिक परिस्थितीमुळे ज्या वर्गांना इंग्रजांच्या राज्यात स्वतःचा आर्थिक विकास घडवून आणता आला, त्यांनी आपल्याच हातात उन्नतीच्या किल्ल्या ठेवणे अगत्याचे आहे.

शिक्षण ही महत्त्वाची किल्ली मानावी, तर स्वातंत्र्याच्या चळवळीपासूनच कर्मवीर भाऊराव पाटलांसारख्यांच्या प्रयत्नाने ते गावोगावी उपलब्ध होते आहे. स्वातंत्र्योत्तर काळात महाराष्ट्रासारख्या पुरोगामी धोरण असणाऱ्या राज्यात सार्वत्रिक शिक्षणाचा उत्तरोत्तर वाढता प्रसार होणार, हेही त्यांना दिसत होते. मग शर्यतीत आधीच पुढे जाऊन उभे राहिलेल्यांनी आणखी पुढे जाण्याचा मार्ग शोधला – इंग्रजी माध्यम ! संख्याशास्त्रीय पुरावे देण्याची ही जागा नाही. परंतु शोधले, तर लक्षात येईल की, इंग्रजी माध्यमांच्या शाळांचे प्रमाण महाराष्ट्र राज्य निर्मितीनंतर अधिक आणि एकोणीसशेसत्तरनंतर विलक्षण वाढले आहे.

सत्ताधारी वर्ग, त्यांनी चालू ठेवलेले बहुराष्ट्रीय कंपन्यांचे उद्योग आणि महाराष्ट्रातील बाजारपेठेवरही असलेले अमराठी वर्चस्व यांमुळे जोपर्यंत व्यापार-धंद्यात इंग्रजीचे महत्त्व आहे, तोपर्यंत आपल्या इंग्रजी माध्यमात शिकलेल्या मुलांना विशेष संधी आहे, हे व्यवहारी पालकांनी नेमके ओळखले होते. शिवाय समाजातील विशिष्ट शिक्षणसंस्थांत असणे हे समाजाच्या 'मंत्रित वर्तुळा'तील स्थानाचे इंगित आहे, हेही त्यांना ठाऊक होते.

आता हे इंग्रजी माध्यमाचे लोण केवळ श्रीमंत आणि उच्चभ्रू माणसांपर्यंतच थांबत नाही. आज ते गावोगावच्या साखर कारखान्यात तर पोहोचलेच आहे. पण

तुमच्या माझ्या दारात येणारी कोळीणही कौतुकाने सांगते, की तिने कष्टपूर्वक तिच्या मुलांना 'चर्चा'च्या शाळेत घातले आहे. तिला काही सांगणे तर आज फारच कठीण आहे. कारण या समाजाच्या ऊर्ध्वगामी गतीप्रमाणे ती वागते आहे. तिला कोणी आणि कसे समजावयाचे – कारण मराठीविषयी भाषणे करणाऱ्या तमाम 'साहित्य सहवासा'तील पुढची पिढी ( प्रा. य. दि. फडके, प्रा. गो. वि. करंदीकर, प्रा. मे. पुं. रेगे यांच्या घरांचा अपवाद करता ) इंग्रजी माध्यमातून शिकलेली आहे.

... इंग्रजी माध्यमातील अनेक विद्यार्थी [च्या] ... मातृभाषेच्या वापरावरही (परिणाम) होतो. एक कोरडे देवघेवीचे साधन म्हणून ते मराठी वापरतात. मराठीतील संदर्भपोषणाची शक्ती त्यांना दिसत नाही – गवसत नाही. मग त्यांची बोली निर्धन आणि कुरचूक होते. ( ही विशेषणे झोपडपट्टीतील माणसांच्या संस्कृतीपासून दूर गेलेल्या भाषेविषयी श्री. ना. ग. गोरे यांनी योजली आहेत, याचे मला स्मरण आहे.) यातूनच शेऱ्याच्या पद्धतीचे संभाषण चालू होते.

**मूळ प्रकाशन** : घुसमटलेली मराठी, **महाराष्ट्र टाइम्स** ( मुंबई ) १९८९.०८.०६ रवि : पृ. एक–दोन (जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने).

## घुसमटलेली मराठी : आणखी एक रोगनिदान

**अशोक रा. केळकर**

असं म्हटलं जातं, की चूक करणं हा माणसाचा हक्क आहे, पण तसलीच चूक पुन्हा करणं हा मूर्खांचा हक्क आहे.

त्याचं असं झालं, की स्वातंत्र्य मिळाल्यानंतर इंग्रजीला तिच्या स्थानावरून खाली ढकलण्याची आपल्या राज्यकर्त्यांना एवढी घाई झाली, की खेर मंत्रिमंडळाने आठवीपासून इंग्रजी सुरू करण्याचा तडकाफडकी निर्णय घेतला. मराठी जनतेने त्याला मूक संमती दिली. तज्ज्ञ, बुद्धिमंत, विचारवंत मंडळी यातले धोके सांगत होती, कमी वर्षांत इंग्रजी शिकवायचे, तर शिक्षकांचा आणि शिक्षणपद्धतीचा कस कितीतरी वाढवायला पाहिजे. तो वाढवायचा, तर किती तरी पूर्वतयारी करायला पाहिजे, मराठी माणसाचे इंग्रजीचे ज्ञान कच्चे राहिले, तर त्याचे व्यावहारिक आणि सांस्कृतिक असे दुहेरी तोटे होतील, वगैरे वगैरे. पण लक्षात कोण घेतो ?

नंतर जनतेला हळूहळू चूक उमगू लागली. इंग्रजीची वर्षे वाढवण्याबद्दल, ती पूर्ववत् पाचवीपासून सुरू करण्याबद्दल तिने सरकारवर दडपण आणले. (सरकारच्या

पातळीवर चूक उमगल्याचं काही लक्षण दिसलं नाही.) मध्यंतरी, उद्योगीकरण आणि नागरीकरण यांचा झपाटा वाढला आणि इंग्रजीचा कमी झालेला कस वाढवण्यासाठी केवळ वर्षे वाढवणे पुरेसे नाही, हे लक्षात येऊ लागलं. यावर खरे म्हणजे शिक्षकांचा आणि भाषाशिक्षणपद्धतीचा कस वाढवणं हा उपाय होता.

भारताच्या चार दाक्षिणात्य घटकराज्यांनी एकत्र येऊन बंगळूर येथे ब्रिटिश काउन्सिलचं तांत्रिक साहाय्य घेऊन १९६३ साली रीजनल इन्स्टिटयूट ऑव्ह इंग्लिश फॉर साउथ इंडिया ही संस्था स्थापन केली आणि इंग्लिश भाषेचं शिक्षण अधिक कसदार होण्यासाठी एक जोरदार कार्यक्रम आखला आणि तो दक्षिणात्य चिकाटीने राबवला. महाराष्ट्र सरकारने बऱ्याच उशिरा मुंबईला स्टेट इन्स्टिटयूट ऑव्ह इंग्लिश फॉर महाराष्ट्र स्थापन केलं. पण कार्यक्रमही फार महत्त्वाकांक्षी नव्हता आणि तो दुबळ्या रीतीने राबवला. इंग्रजीचं शिक्षण घाईनं कमी करण्याचे दूरगामी दुष्परिणाम आपल्याला अजून भोवत आहेत.

इकडे जनतेने आपला मार्ग शोधला – तो भलताच ! आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमातून शिक्षण माध्यमिक स्तरापासून कसे मिळेल, याची चिंता पालक करू लागले. काहींना तर तेवढंही पुरेसं वाटलं नाही. त्यांनी तर प्राथमिक स्तरापासून – नव्हे, पूर्वप्राथमिक स्तरापासूनच इंग्रजी माध्यमातून शिक्षण आपल्या मुलांना मिळवून देण्याची खटपट केली. या खेपेला जनतेच्या घिसाडघाईला सरकारची मूक संमती राहिली, एवढंच. बाकी कथानक पूर्वीसारखंच. तज्ज्ञ, बुद्धिमान, विचारवंत मंडळी ऊर्ध्व बाहू करून यातले धोके सांगत आहेत. या घाईचे दूरगामी दुष्परिणामही हळूहळू दिसू लागले आहेत. पण लक्षात कोण घेतो ?

आपला सांस्कृतिक आणि बौद्धिक आत्मघात करून घ्यायचं मराठी जनतेनं पक्कं ठरवलेलं दिसतं. तज्ज्ञ आदी मंडळींची ऐसीतैसी !

सांस्कृतिक आणि बौद्धिक आत्महत्या ही जरा कडक भाषा वाटते का ? मुळीच नाही. ते एक नेमकं वर्णन आहे. (इतिहासकार राजवाडयांनी मराठी भाषा मुमूर्षू आहे, म्हणून वर्तवलेलं भविष्य थोडया वर्षांच्या फरकानं खरं ठरणार, की काय, अशी स्थिती उत्पन्न झालेली दिसते.)

**मूळ प्रकाशन** : आग रामेश्वरी बंब सोमेश्वरी, **साप्ताहिक सकाळ** ( पुणे ) १९८९.०६.२४, पृ. ८, २४.



अनुक्रमणिका

# मराठी माणसाचे इंग्रजी घर

## म. अ. मेहेंदळे

कवी कुसुमाग्रजांना ज्ञानपीठ पुरस्कार अर्पण करण्याचा समारंभ काही महिन्या-पूर्वी मुंबईस साजरा झाला. त्याप्रसंगी भाषण करताना कवी कुसुमाग्रज म्हणाले होते,

"इंग्रजीवर एक संपन्न भाषा म्हणून माझेही प्रेम आहे. जगातील ज्ञान-विज्ञानाशी संपर्क साधणारी ती एक खिडकी आहे. हे सुभाषित मलाही मान्य आहे. पण खिडकी म्हणजे घर नव्हे."

म्हणजे कुसुमाग्रजांची रास्त इच्छा अशी, की मराठी माणसाचे राहण्याचे घर मराठी असावे. फक्त त्याची खिडकी तेवढी इंग्रजी असावी.

पण वस्तुस्थिती अशी आहे, की गेल्या कित्येक वर्षांपासून सुशिक्षित मराठी माणूस इंग्रजी 'घरात' राहणे पसंत करत आहे. इंग्रज आपला देश सोडून गेले, तरी मराठी माणसाचा त्यांच्या घराविषयीचा हव्यास कमी झाला नाही. मराठी माणसाला शक्य असते, तर तो इंग्रजांच्या देशात जाऊन तिथे खऱ्याखुऱ्या इंग्रजी घरात राहिला असता. पण ते शक्य नाही. तेव्हा तो इथेच एक शाब्दिक इंग्रजी घर बांधतो आणि तिथे राहण्यात धन्यता मानतो.

हा मराठी माणूस 'रिटायर्ड' होण्याच्या आसपास एखाद्या 'कॉलनीत' प्लॉट घेतो, नाही तर एखाद्या हाऊसिंग सोसायटीत किंवा अपार्टमेंट हाऊसमध्ये 'फ्लॅट' घेतो. ही सोसायटी कुणाचे प्रबोधन करणारी असली, अस्सल भारतीय असली, तरी असते मात्र 'सोसायटी' किंवा 'कॉलनी.' तिथे मराठी माणसाचा प्लॉट असला, तर तो त्यावर बंगला बांधतो, नाहीतर त्याला फ्लॅटवर समाधान मानावे लागते. तत्पूर्वी बांधकाम जिथे करायचे, तिथे पोचायला 'अप्रोच रोड' आहे, की नाही, तसेच ती जागा 'एन ए' झाली आहे, की नाही, याची खात्री करून घेतो.

बंगल्याचा किंवा फ्लॅटचा 'प्लॅन' तयार होताना 'बिल्टअप एरिया' किती, 'कार्पेट एरिया' किती, 'ओपन स्पेस' किती, त्याची 'मेझरमेंटस्' तयार होतात. बांधकाम 'स्टिल्ट'वर घेऊन 'पार्किंग स्पेस' देता आली, तर ती सोय बघण्यात येते. बंगलेवाल्यांना स्पेसबाबतीचे मोजमाप फार घट्ट नसले तरी चालते. 'फ्लॅट-वाल्यांना ते चापूनचोपून बसवावे लागते. सर्वसाधारणपणे आमच्या या मराठी माणसाच्या फ्लॅटमध्ये एक 'किचन' किंवा 'किचन कम डायनिंग रूम' असते. एक 'लिव्हिंग रूम' आणि एक अथवा दोन 'बेडरूम्स' असतात. फ्लॅटहोल्डर जरा बऱ्या स्थितीतला असला, तर त्याच्याकडे एक 'गेस्ट रूम' अथवा 'स्टडी' असते. फ्लॅटमध्ये एक संडास आणि एक 'बाथरूम' असल्यास ती दोघे सेपरेट

राहतात, पण दोन असल्यास एकत्र नांदतात. त्यांना ' अॅटच्ड टॉयलेट ' असे मराठीत म्हणतात. संडास सेपरेट असल्यास, तो ' इंडियन स्टाईल ' असतो. बाथरूमबरोबर एकत्र नांदत असल्यास तो ' वेस्टर्न स्टाईल ' असतो. क्वचित ' अँग्लो इंडियन ' असतो. घरात 'फ्लोअर'वर ' टाइल्स ' बसवायच्या की ' ब्लॅक स्टोन, ' संडास–बाथरूममध्ये ' डोडो ' किती उंच हवा, किचनमध्ये ' सिंक ' कुठे, ' वॉश बेसिन ' कुठे हे त्या इंग्रजी घरात राह्यला येणाऱ्या मराठी माणसाच्या संमतीने ठरविणे शक्य असते.

फ्लॅटच्या बाहेरच्या अंगाला लहान–मोठ्या ' बाल्कनीज ' असू शकतात. त्यांना नंतर 'ग्रिल्स' टाकून बंदिस्त करता येते.

पूर्वीचा मराठी माणूस अंगण, ओसरी, देवघर, माजघर, उठाय–बसायची खोली असलेले घर बांधत असे आणि तेथे राहायला येण्यापूर्वी वास्तुशांत करीत असे. आताचा मराठी माणूस वर वर्णिलेल्या इंग्रजी घरात राहायला येण्यापूर्वी वास्तुशांतीच्या नेमकी उलटी 'हाऊस वॉमिंग पार्टी' देत असतो...

मराठी माणसाने इंग्रजी घराचा ध्यास घेतला असला, तरी तिकडे इंग्रजी माणूस मात्र ' संस्कृत कुटुंबात ' रहात आहे.

विवाहबद्ध झालेला मराठी माणूस अगर इंग्रजी माणूस आपापल्या स्वतंत्र घरात राहायला गेला, की एका नव्या कुटुंबास सुरुवात करतो. त्यांना मुलेबाळे झाली, की काही जवळची नाती निर्माण होतात. कोणी ' बाप ' बनतो, कोणी ' आई ', त्यांना ' मुलगा ' होतो, अथवा ' मुलगी ' आणि ही मुले एकमेकांचे भाऊ–बहीण असतात. कुटुंबातली ही अगदी जवळची अशी नाती. यांचे एक कुटुंब बनते. ही नाती व्यक्त करणारे संस्कृत शब्द पाहावेत तर ते असे आहेत : (१) पितर्, (२) मातर्, (३) सून, (४) दुहितर, (५) भ्रातर, आणि (६) स्वसर्. संस्कृतला मराठी आपली आजी मानते, पण आजीचं आजीपण सिद्ध करणारा एकतरी शब्द आजच्या मराठीत उरला आहे का ? आई–बाप, मुलगा–मुलगी– आहे कुठे संस्कृत शब्दांशी काही संबंध ? नाही म्हणायला भावाने (भ्रातर्) थोडी पुसट खूण शिल्लक ठेवली, आहे.

या उलट वरील नाती व्यक्त करणारे इंग्रजी भाषेतले शब्द पाहिले father (पितर्), mother (मातर्), son (सूनु), daughter (दुहितर्), brother (भ्रातर्), sister (स्वसर्) तर त्यांनी आपली मावशी–आजी जी संस्कृत तिच्याशी प्रत्येक शब्दात आणि प्रत्येक अक्षरात आपले नाते (स्पेलिंगपुरते) अजून टिकवून ठेवले आहे.

**मूळ प्रकाशन** : इंग्रजी ' घरात ' राहणारा मराठी माणूस, **रविवार सकाळ** (पुणे) १९८९, ०६, १८, पृ. ६.





अनुक्रमणिका

# मराठी परभाषा म्हणून शिकवताना

## जयंत धुपकर

रमेश धोंगडे, उषा रानडे, अपर्णा झा यांचे **मराठी शिका** आमच्या संस्थानाच्या ग्रंथालयात येऊन बरेच दिवस झाले. ते नजरेला पडताच परीक्षण लिहायच्या विचाराने मी ते वाचायला घेतले. पण माझ्या हातून काही पुस्तकपरीक्षण लिहून व्हायच्या आधीच इरीना ग्लुश्कोव्हा यांचे पुस्तकपरीक्षण **भाषा आणि जीवन**मध्ये प्रकाशित झाले. एकाच पुस्तकाची दोन परीक्षणे एकाच नियतकालिकात प्रसिद्ध करण्याची प्रथा नसावी, मग ती परीक्षणे वेगवेगळ्या दृष्टिकोणांतून लिहिलेली असली, तरी, या विचाराने **मराठी शिका**चे दुसरे परीक्षण संपूर्णपणे पाठवण्याऐवजी केवळ त्यातील प्रमुख मुद्दे जे टीकात्मक आहेत – ते मी इथे मांडत आहे. पुस्तकाला नकारात्मक दृष्टिकोणातून पाहण्याचा माझा विचार नाही, हे प्रथमच सांगणे मला आवश्यक वाटते आणि त्या दृष्टिकोणातून माझे आणि ग्लुश्कोव्हांचे पूर्णपणे एकमत असेल.

(१) अभ्यास २९ च्या शेवटी 'सर्वच क्रियापदांपासून सर्वच संदर्भांत अशी विशेषणे होत नाहीत', ही जी तळटीप आहे, तिला अनुसरून परिशिष्ट 'ख' मध्ये क्रियापदांच्या यादीत ज्या क्रियापदांपासून तशी विशेषणे बनतात, त्यांना तारांकित करणे योग्य होईल.

(२) पुस्तकातील अभ्यासांची सूचना 'शिक्षकाचा प्रश्न आणि विद्यार्थ्याचे उत्तर' अशी आहे. (भाषा शिकवण्याच्या क्षेत्रात याला structural approach म्हणतात). तथापि, भाषा ही प्रयोगशील असते आणि प्रश्नोत्तराच्या साच्यात बसतेच, असे नाही. **मराठी शिका**तील अभ्याससामग्री या साच्यात बसवण्याचा प्रयत्न केल्याने, अनवधानानेच, अभ्यास १६ त गमतीशीर प्रसंग उद्भवला आहे. या अभ्यासात 'आज्ञार्थ' शिकवला आहे, त्यामुळे शिक्षकांनी 'तुमचा हात दाखवा' अशी आज्ञा करावी आणि विद्यार्थ्याने 'हा माझा हात' असे उत्तर द्यावे, अशी सूचना अभ्यासाच्या सुरुवातीला आहे.

तथापि, वास्तविकदृष्ट्या 'तुमचा हात दाखवा' या आज्ञेला हात दाखवणे ही क्रियाच उत्तर ठरेल, 'हा माझा हात' हे केवळ वाक्य ठरणार नाही. शिवाय खरे तर आज्ञेला 'उत्तर' म्हणून दिले जात नाही, ती आज्ञा पाळली जाते किंवा मोडली जाते, झुगारली जाते.

(३) भाषेचे हे प्रयोगशीलत्व **मराठी शिका** या पुस्तकात जास्त आणायला पाहिजे, नाही तर पुस्तकामार्फत शिकवली जाणारी भाषा सपक बनण्याची शक्यता

असते. याची एक–दोन उदाहरणे पुस्तकातून देतो.

**अभ्यास** ४४ – '' मीं अकरा वाजता जेवतो. मी पोळी खातो, मी भात खातो. मी तूप खातो. मी वरण खातो. ' व्यवहारात ' मी पोळी, भात, तूप, वरण खातो ' अशी वाक्यरचना होईल.

**अभ्यास** ७७ – '' मी परत साडेपाचची गाडी पकडते. सहा वाजता मी घरी येते. मुले वाट पाहतात. मी त्यांना चहा देते व. ' यात ' मुले वाट पाहतात ' हे कितपत योग्य आहे ? माझ्या मते ' मुले वाट पाहत असतात ' म्हटले जाईल.

आमच्या संस्थानातील इतर मराठी–भाषकांबरोबर मी या संदर्भात चर्चा केली. मतैक्य झाले नाही.

**फ्रेंच भाषा विभाग, केंद्रीय इंग्रजी आणि विदेशी भाषा संस्थान, हैदराबाद ५०००0७**

## शंका आणि समाधान

# मुले वाट पाहतात, की मुले वाट पहात असतात ?

प्रा. जयंत घुपकर यांच्या टिपणाच्या छेदक ३ मध्ये उपस्थित केलेल्या शंकेबद्दल थोडेसे. ' वाट पाहतात ' आणि ' वाट पहात असतात ' या दोन्ही पदबंधांचा उपयोग वर्तमानकाळची रीत दाखवायला होऊ शकतो, हे खरे. पण अभ्यास ७७ मधील संदर्भात याचबरोबर घटनांच्या क्रमाचे कथनही केलेले आहे. यामुळे ' वाट पाहतात ' म्हटले, तर ' मी घरी येते, नंतर मुले वाट पाहतात ', असा मनाला न पटणारा अर्थ निघतो आणि म्हणून ते वाक्य त्या संदर्भात घुपकरांना खटकले, ते स्वाभाविक आहे. त्या जागी ' वाट पाहत असतात ', अशी शब्दयोजना योग्य वाटते. कारण त्यामुळे ' मी घरी येतें. त्या वेळी मुले वाट पाहत आहेत, अशी स्थितीं असते ' असा मनाला पटणारा अर्थ निघतो. ' मुले वाट पाहत असतात ' या वाक्याने घटनांचे क्रमवार कथन तात्पुरते स्थगित केले जाते आणि ' मी घरी येते ' या मागच्या घटनेला मिळणाऱ्या पार्श्वभूमीचे स्थिरचित्र टिपले जाते. ' चहा देते ' म्हटले, की घटनांचे चलच्चित्र पुढे चालू होते. माझ्या **मराठी भाषेचा आर्थिक संसार** ( औरंगाबाद १९७७ ) या पुस्तकाच्या प्रकरण २ मध्यें या विषयाची चर्चा आली आहे. क्रियापदांचे काळ आणि उपकाळ ( पूर्ण, अपूर्ण, रीति सारख्या भेदांना काळाचे उपभेद मानण्यापेक्षा क्रियाव्याप्तीचे भेद मानणे अधिक योग्य ठरेल ) यांच्या आधुनिक अर्थविचाराचा कथा-कादंबऱ्यांच्या तंत्राच्या विश्लेषणासाठी किती उपयोग होऊ शकेल, हे या ठिकाणी जाणवावे.

**अशोक रा. केळकर, पुणे**





अनुक्रमणिका

# इंग्लिश व्याकरणातील एक चकवा : भविष्यकाळ

मिलिंद स. मालशे

## एक

इंग्लिश भाषेचे व्याकरण शिकता–शिकवताना 'काळ' (tense) ही एक महत्त्वाची कल्पना आपण वापरतो. 'काळा'च्या दृष्टीने इंग्लिशमध्ये तीन धातुरूपे आहेत, असे मानून प्रत्येक क्रियापद तीन काळांमध्ये चालवून दाखविण्याचा प्रघात आहे. काळे यांचे इंग्रजी भाषांतरपाठ[१] पाहिल्यास त्यात इंग्रजी व मराठी काळ–रूपांचा तुलनात्मक तक्ता आढळतो. त्यात वर्तमान, भूत, व भविष्य या तीन काळांची रूपे दिलेली आहेत :

(१) साधा वर्तमान : He eats. तो खातो.

(२) साधा भूत : He ate. त्याने खाल्ले.

(३) साधा भविष्य : He will eat. तो खाईल.

नेस्फील्ड किंवा रेन व मार्टिन[२] या लेखकांनी लिहिलेल्या लोकप्रिय शालोपयोगी व्याकरणांमध्ये सुद्धा याच प्रकारची उदाहरणे दिलेली आहेत.

इंग्लिशच्या व्याकरणाची मांडणी पारंपरिक धर्तीने करणाऱ्या पुस्तकांमध्ये आणखी एक महत्त्वाचा मुद्दा मांडलेला आढळतो. तो म्हणजे काळांची धातुरूपे आणि कालनिर्देशन यांमध्ये एक निश्चित संबंध असतो, असे येथे मानलेले असते. वर्तमानकाळाची धातुरूपे क्रिया वर्तमानात घडते, असे दाखवतात; भूतकाळाची रूपे क्रिया बोलण्याच्या क्षणाच्या आधी घडली, असा अर्थ व्यक्त करतात; तर भविष्यकाळाची रूपे क्रिया बोलण्याच्या क्षणाच्यानंतर म्हणजे भविष्यात घडेल, असा अभिप्राय व्यक्त करतात – या स्वरूपाचे विवेचन या व्याकरणांमध्ये सापडते. नेस्फील्डची उदाहरणे पुढीलप्रमाणे आहेत :

(१) He sees a star.

(२) He saw a star.

(३) He will see a star.

रेन व मार्टिन यांनी write व love अशी दोन क्रियापदे याच प्रकारे चालवून दाखविलेली आहेत. नेस्फील्ड यांनी काढलेला निष्कर्ष प्रातिनिधिक स्वरूपाचा आहे :

A verb, then, has three main times or tenses, viz. the present, the past, and the Future.[३]

तेंव्हा क्रियापदांची रूपे व त्यांचा काळाशी संबंधित अर्थ (कालनिर्देशन) यांच्यांत एकास-एक असें नाते असते, किंबहुना रूपे व अर्थ एकच असतात, असा या सर्व व्याकरणकारांचा अभिप्राय दिसतो. परंतु खरें पाहता परिस्थिती जास्त गुंतागुंतीची आहे. ही गुंतागुंत थोडी अधिक नीटपणे समजून घेण्याचा प्रयत्न पुढील विवेचनात केला आहे.

## दोन

अगदी वरवर पाहून तुलना केली, तरी सुद्धा मराठीआणि इंग्लिश धातुरूपांतील एक फरक सहज दिसतो. मराठीमध्ये 'खा' या धातूची 'खातो', 'खाते', 'खाल्ले', 'खाईल' अशी रूपे 'साध्या' काळांमध्ये होतात. (दामल्यांच्या व्याकरणामध्ये या रूपांना ताख्यात, लाख्यात, आणि ईलाख्यात अशी नावे प्रत्ययानुसार दिलेली आहेत.[४]) इंग्लिशमध्ये साध्या वर्तमानकाळात eat व eats अशी आख्यातरूपे होतात, तर साध्या भूतकाळात ate असे रूप होतें. मात्र साध्या भविष्यकाळाचे रूप म्हणून मानली जाणारी रचना will eat अशी आहे. ही रचना eat चे रूप म्हणता येईल का ? खरे म्हणजे will या सहायक क्रियापदाबरोबर eat या धातूचे प्रत्ययहीन म्हणजेच शून्यप्रत्ययी रूप या रचनेमध्ये आहे, असे म्हणणे अधिक योग्य ठरेल. तेव्हा इंग्लिशमध्ये भविष्यकाळी मानल्या गेलेल्या रूपाचा प्रकार थोडा वेगळा, इतर दोन काळांच्या रूपांशी न जुळणारा आहे, एवढे येथे नोंदवून ठेवू.

इंग्लिशमध्ये will आणि shall या दोन सहायक क्रियापदांची जोड प्रमुख धातूंना देऊन भविष्यकाळाची रूपे साधली जातात, असे तरी म्हणता येईल का ? तशी भूमिका स्वीकारण्यात काही अडचणी आहेत. एक म्हणजे will eat आणि shall eat यांना भविष्यकाळी रूपे वा रचना मानले, तर would eat आणि shouid eat यांचा काळ कोणता म्हणायचा, हा प्रश्न उभा राहतो. 'भविष्यकाळातील भूतकाळ' वगैरे थातूरमातूर उत्तर देऊन प्रश्न सुटणार नाही. would व should ही अनुक्रमे will व shall यांची भूतकाळी रूपे आहेत, हे उघड आहे. याच धर्तीवर can-could, may-might अशा वर्तमानकाळी-भूतकाळी रूपांच्या जोड्या इतर सहायक क्रियापदांच्या बाबतीतही दाखविता येतात. या सर्वच सहायक क्रियापदांमध्ये काही ठळक साम्यस्थळे दिसतात. उदाहरणार्थ, यांच्याबरोबर प्रमुख धातूंची शून्य प्रत्ययी रूपेच येऊ शकतात :

| | |
|---|---|
| १. (अ) will | १. (आ) would |
| २. (अ) shall | २. (आ) should |
| ३. (अ) can | ३. (आ) could |
| ४. (अ) may | ४. (आ) might |

तसेच या सहायक धातूंना – ing व en यांनी साधणारी धातुसाधित रूपे नसतात; आणि त्यांना to eat, to walk या धर्तीवर होणारें इनफिनिटिव्हचे रूपही नसते.

या सर्व चर्चेमधून निघणारा थोडासा व्यापक स्वरूपाचा मुद्दा आता नोंदवायला हवा : इंग्लिशमध्ये साध्या काळाची (simple tense) व्याकरणिक रूपे दोनच प्रकारची असतात; सोयीसाठी एकाला वर्तमानकाळी रूप, तर दुसऱ्याला भूतकाळी रूप म्हणता येईल. हेच तत्त्व प्रमुख धातूंबरोबर सहायक धातूंनाही लागू पडते. (मात्र त्यांना – s प्रत्यय लागत नाही.)

| साध्या वर्तमानकाळाची रूपे : | साध्या भूतकाळाची रूपे : |
|---|---|
| १. (अ) eat व eats | १. (आ) ate |
| २. (अ) walk व walks | २. (आ) walked |
| ३. (अ) will | ३. (आ) would |
| ४. (अ) shall | ४. (आ) should |
| ५. (अ) can | ५. (आ) could |
| ६. (अ) may | ६. (आ) might |

एका सहायक धातूच्या बाबतीत तर ही दोन्ही रूपे सारखीच असतात, तो म्हणजे must धातू.

तेव्हा व्याकरणिक रूपाच्या दृष्टीने विचार केला, तर इंग्लिशमध्ये भविष्यकाळाची स्वतंत्र धातुरूपे वा आख्यातरूपे नाहीत, असे म्हणायला हवे.

## तीन

क्रियापदाची व्याकरणिक रूपे (किंवा दामल्यांच्या भाषेत बोलायचे, तर आख्यात-रूपे) आणि त्यांचा वाक्यरचनांमधील विनियोग या दृष्टीनें विचार केला, तर इंग्लिशमध्ये मुख्य धातूंची (main/lexical verb) पुढील पाच प्रकारची रूपे वेगळी काढता येतात :

(१) " शून्यप्रत्ययी " रूप I eat / walk / cut
(वर्तमानकाळी रूप : तृतीय पुरुष एकवचनाखेरीज इतर सर्वत्र प्रयोग);
(२) " – s " रूप : He eats / walks / cuts
(वर्तमानकाळी रूप : फक्त तृतीय पुरुष एकवचनाबरोबर प्रयोग);
(३) " – ed " रूप : she / ate / walked / cut
(भूतकाळी रूप : सर्व पुरुष सर्व वचनांत प्रयोग)
(४) " en " रूप : He has eaten / walked / cut
(५) " ing " रूप She is eating / walking / cutting





अनुक्रमणिका

या मांडणीमध्ये be या धातूवर आपण अन्याय केला आहे, कारण या धातूची आठ रूपे आहेत : be, am, are, is, was, were, being, been. मात्र हा धातू सोडल्यास बाकी सर्व मुख्य धातू या " पंचरूपी " व्यवस्थेत बसतात.

नोंदवण्यासारखी आणखी एक गोष्ट म्हणजे (१), (२) व (३) या रूपांनी सहायक धातूच्या मदतीशिवायच पूर्ण वाक्य सिद्ध होते. म्हणून या रूपांना आख्यात-रूप ( finite form ) म्हणून वेगळी काढतात. याउलट (४) व (५) या रूपांना have व be या सहायक धातूंची मदत घेतल्याशिवाय पूर्ण वाक्य सिद्ध करता येत नाही व म्हणून त्यांना आख्यातेतर ( non-finite ) रूपे वा धातुसाधित रूपे म्हणतात.

या आख्यातेतर रूपांना वा धातुसाधितांना जी पारंपरिक नावे आहेत, ती थोडीशी घोटाळ्यात टाकणारी आहेत. -ing रूपाला present participle व -en रूपाला past participle म्हणण्याचा प्रघात आहे.[५] परंतु वस्तुतः ही नावे दिशाभूल करणारी आहेत, कारण ही दोन्ही धातुसाधिते वर्तमानकाळी, तसेच भूतकाळी अशा दोन्ही व्याकरणिक रचनांमध्ये वापरता येतात : उदा.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| (४) | ( अ ) | I | have | eaten. | ( वर्तमान : have ) |
| | ( आ ) | I | had | eaten. | ( भूत : had ) |
| (५) | ( अ ) | I | am | eating. | ( वर्तमान : am ) |
| | ( आ ) | I | was | eating. | ( भूत : was ) |

येथे वाक्याचा काळ ठरतो तो -ing किंवा -en यांच्यावरून ठरत नसून be व have या सहायक धातूंच्या रूपांवरून ठरतो, हे सहज लक्षात येईल.

## चार

भविष्यकाळ या कल्पनेकडे आता पुन्हा वळू. वर मांडलेल्या पंचरूपी व्यवस्थेत ' भविष्यकाळी ' आख्यात रूप वा रचना दाखविता येत नाही. will व shall या सहायक धातूंच्या मदतीने सिद्ध झालेल्या रचनांना भविष्यकाळ असे व्याकरण-दृष्टचा का म्हणता येणार नाही, हे आपण आधी पाहिलेच आहे. व्याकरणिक घडणीच्या दृष्टीने I shall go किंवा He will go ही रचना वर्तमानकाळी, तर I should go किंवा He would go ही भूतकाळी असे म्हणणेच सयुक्तिक ठरेल. can-could, may-might या जोड्यांच्या बाबतीतही हाच नियम लागू पडतो.

यावर एक आक्षेप सहजपणे घेता येईल. तो असा, की I shall go या वाक्यातून भविष्यात क्रिया घडणार आहे, असा अर्थच व्यक्त होतो; आणि हे खरे असेल, तर त्याला भविष्यकाळी रचना म्हणायला काय हरकत आहे ? या आक्षेपाला उत्तर

द्यायचे, तर आपला पूर्वीचाच मुद्दा पुन्हा मांडावा लागेल : व्याकरणिक काळरूप आणि कालनिर्देशनात्मक अर्थ यांच्यामध्ये एकास एक नातें असते, असे मानणे चुकीचे आहे. पुढील उदाहरणे पुरावा म्हणून देता येतील :

(१) I eat. ही रचना व्याकरणदृष्टचा वर्तमानकाळी असली, तरी तिच्यातून नियमितपणे वा वारंवार घडणाऱ्या क्रियेचाच ( habitual action ) अर्थ बहुतेक वेळा व्यक्त होतो.

(२) I am leaving tomorrow. ही रचना व्याकरणदृष्टचा अपूर्ण वर्तमानकाळी ( present progressive ) असूनही भविष्यातील क्रियेचा अर्थ व्यक्त करण्यासाठी वापरली जाते.

(३) ( अ ) I want to ask you something. आणि
( आ ) I wanted to ask something.
या रचनांचा व्याकरणिक काळ अनुक्रमे वर्तमान व भूत असला, तरी अर्थाच्या दृष्टीने कालनिर्देशनातील भेदापेक्षा आदबशीरपणातील भेद अधिक महत्त्वाचा आहे; (आ) ही रचना (अ) पेक्षा अधिक आदबशीर मानली जाते.

(४) ( अ ) The match will be over by now.
(आ) The match should be over by now.
या दोन्ही रचनांचे व्याकरणिक काळ वेगवेगळे असले, तरी अर्थाच्या दृष्टीने दोन्हींतून भविष्यसूचनच होते, असे म्हणायला हवे.

(५) ( अ ) I shall go. आणि
(आ) I should go.
या रचनांचे व्याकरणिक काळ अनुक्रमे वर्तमान व भूतकाळ, असे असले, तरी अर्थाच्या दृष्टीने या रचना खूपच भिन्न आहेत (अ) मधून हेतू किंवा बेत ( intention ) व्यक्त होतो, तर (आ) मधून जायलाच हवे आहे, अशा स्वरूपाची इष्टता सूचित होते.

काळ ही व्याकरणिक संकल्पना आणि कालनिर्देशन हे आशयतत्त्व या अर्थघटक यांच्यामध्ये कोणतेही एकास–एक नाते नाही. असे अशा प्रकारच्या उदाहरणांवरून लक्षात येते.

## पाच

या सर्व विवेचनामधून दोन महत्त्वाचे निष्कर्ष आपल्याला काढता येतील. पहिला निष्कर्ष असा, की इंग्लिशमध्ये व्याकरणिक रूपाच्या दृष्टीने भविष्यकाळ ही कोटी अस्तित्वात नाही; व्याकरणकारांनी निर्माण केलेला तो एक चकवा आहे.

लॅटिन भाषेला लागू पडणाऱ्या कोटी इंग्लिशवर लादल्यामुळे हा चकवा निर्माण झाला, असे म्हणता येईल. कारण काही असो; चकवा आहे, हे निश्चित. व्याकरणाकडे परंपरावादी दृष्टीने पाहणाऱ्यांना हा निष्कर्ष अर्थातच धक्कादायक वाटेल. पण तो स्वीकारण्याशिवाय गत्यंतर नाही, अशी परिस्थिती इंग्लिश भाषेच्या बाबतीत आहे.

दुसरा निष्कर्ष जास्त व्यापक स्वरूपाचा आहे, व आपण त्याची मांडणी आधीच केलेली आहे. हा निष्कर्ष म्हणजे व्याकरणिक काळरूपे व कालनिर्देशनात्मक अर्थ यांच्यांतील नाते गुंतागुंतीचे असते; वर्तमानकाळी रूपे वा रचना यांतून वर्तमान-काळाचेच निर्देशन होईलच, असे नव्हे; तसेच व्याकरणिक भूतकाळ व भूतकाळात क्रिया घडली, असा अर्थ, यात एकास एक नाते असेलच, असे नव्हे. या निष्कर्षामधून निघणारा आणखी एक महत्त्वाचा मुद्दा येथे शेवटी मांडायला हवा. इंग्लिशमध्ये व्याकरणाच्या दृष्टीनें भविष्यकाळ अस्तित्वात नसला, तरी भविष्यात होणाऱ्या क्रियांचे निर्देशन इंग्लिशमध्ये होऊ शकत नाही, असा त्याच्यातून अर्थ काढणे योग्य होणार नाही.

काहीशी वेगळी उदाहरणे घेऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल. संस्कृतमध्ये नामांची तीन संख्यावचनरूपे आहेत : एकवचन, द्विवचन आणि बहुवचन. याउलट, मराठीमध्ये एकवचन आणि बहुवचन अशी दोनच संख्यावचनरूपे आहेत. परंतु त्यांवरून मराठी भाषेत दोन वस्तूंविषयी वा व्यक्तींविषयी बोलणेच शक्य होत नाही, असे आपण म्हणू का ? किंवा हिंदी भाषेत नामांची, सर्वनामांची व विशेषणांची लिंगव्यवस्था दोनच लिंगरूपे दाखविते; मराठीप्रमाणे पुल्लिंग, स्त्रीलिंग, व नपुंसकलिंग अशी त्रिविध व्यवस्था हिंदीत नाही, तर (पुल्लिंग व स्त्रीलिंग अशी द्विविध व्यवस्था आहे. परंतु याचा संबंध लिंगविषयक अर्थाशी काही नाही, ही गोष्ट उघड आहे. मराठीतही तो पंखा, ती खुर्ची, ते टेबल, या त्रिविध व्याकरणिक व्यवस्थेचा नामांच्या अर्थाशी काहीही संबंध नाही. तेव्हा 'वचन' व 'लिंग' यांच्याप्रमाणेच 'काळ' हीसुद्धा एक व्याकरणिक रूपव्यवस्था आहे असे मानणे भाग आहे.

ही रूपव्यवस्था अर्थ कोणत्याप्रकारे व्यक्त करते, हा मुद्दा अर्थातच महत्त्वाचा आहे. इंग्लिशच्या संदर्भात विचार केल्यास भविष्याचे निर्देशन पुढील रूपांच्या व रचनांच्या साहाय्याने होते, असे दाखवता येईल.

(१) साध्या वर्तमानकाळाची रचना :
When does the match begin tomorrow ?

(२) be going to ची रचना :
He is going to deliver a lecture tomorrow.







(३) to be ची रचना :

He is to deliver a lecture soon,

(४) अपूर्ण वर्तमानकाळाची रचना :

He is moving to Pune next month.

(५) will व shall या सहायक धातूंच्या वर्तमानकाळी रूपांच्या मदतीने सिद्ध होणाऱ्या रचना :

He will come tomorrow.

I shall do it next week.

वरील उदाहरणांमध्ये tomorrow, soon, next week, next month यांसारखे भविष्यवाचक अर्थ व्यक्त करणारे क्रियाविशेषणात्मक प्रयोग आलेले आहेत व त्यामुळे केवळ धातुरूपांतून भविष्यकाळाचा अर्थ व्यक्त होतो, असे म्हणता येणार नाही. यावरून बोध घ्यायचा तो असा, की भाषेची व्याकरणिक रूपव्यवस्था व विशिष्ट आशय वा अर्थ व्यक्त करण्यासाठी त्यांचा होणारा उपयोग, हा प्रांत बराच गुंतागुंतीचा आहे. भाषाचें नीट आकलन व्हायला हवे असेल, तर ही गुंतागुंत उलगडण्याचा प्रयत्न करीत राहण्याखेरीज दुसरा मार्ग नाही.

## संदर्भ


१. Kale, G. R. Lessons in English Translation, Macmillan & Co. Bombay, 1945, P. 12

२. पहा : (१) Nesfield. J. C. 'Idiom, Grammar and Synthesis, Macmillan, Calcutta, 1961.

(२) Wren, P. C. and H. Martin 'High School English Grammar and Composition', S Chand & Co.. New Delhi. 1987 ( 120 th ed. revised by N. D. V. Prasad Rao ).

३. Nesfield, Idioms..., P. 59.

४. दामले मोरो केशव, शास्त्रीय मराठी व्याकरण (संपा. कृ. श्री. अर्जुनवाडकर) रा. ज. देशमुख, पुणे १९७०, पृ. ३७२–८८

५. पाहा : Nesfield, Idioms, 71–73



मानव्यविद्या व सामाजिक विज्ञान विभाग, इंडियन इन्स्टटयूट ऑव्ह टेक्नॉलजी, मुंबई ४०००७६







अनुक्रमणिका

# पारिभाषिक संज्ञांचे घरकूल

संहितासमीक्षा आणि पारिभाषिक संज्ञा. लेखक : वसंत दावतर, मुंबई महाराष्ट्र साहित्य-संस्कृती मंडळ, १९८७. ४; चार; १६१ पृष्ठे; ६३ रुपये.

**परीक्षणलेखक : अशोक रा. केळकर**

महाराष्ट्र सरकारतर्फे मराठी भाषेत पारिभाषिक संज्ञा बनवून त्यांचे कोश प्रसिद्ध करण्याचे कार्य मुख्यत: भाषा-संचालन कार्यालयामार्फत चालू आहे. (उदाहरणार्थ, या कार्यालयाने १९८७ मध्ये प्रकाशित केलेला इंग्रजी-मराठी, मराठी इंग्रजी अशा दुहेरी **साहित्यसमीक्षा परिभाषा कोश**) या प्रतिशब्दकोशांपेक्षा प्रस्तुत प्रयत्नाचा उगम व स्वरूप बरेच वेगळे आहे. (या प्रयत्नाची तुलना कराचीच तर राजेंद्र व्होरा, सुहास पळशीकर यांच्या **राज्यशास्त्र शब्दकोश**, पुणे : दास्ताने, १९८७ या स-विवरण प्रतिशब्दकोशाशी होऊ शकेल. सुहास पळशीकरांच्या 'मराठीतून राज्यशास्त्र : दोन प्रयत्न', **भाषा आणि जीवन** ६ : १ हिवाळा १९८८, हा लेख या संदर्भात पाहावा.)

प्रा. वसंत दावतरांनी १९७७ मध्ये मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात प्रियोळकरांच्या स्मृत्यर्थ 'संहितासमीक्षेची परिभाषा' यावर व्याख्यान देऊन विषय-प्रवेश केला. नंतर त्याचा चिकाटीने परिश्रमपूर्वक पाठपुरावा केला. पुस्तकात नसलेली अनुक्रमणिका (का कुणास ठाऊक?) तयार करायची तर ती अशी दिसेल.

० विवेचनाची बैठक १-८
१ संहितेचे सामाजिक अभिसरण आणि संहितासमीक्षा ९-२६
२ संहितासमीक्षा : स्वरूप आणि यंत्रणा २७-४३
३ संहितासमीक्षा : संकल्पना आणि संज्ञा ४४-१३१
संज्ञा-सूची : मराठी-इंग्रजी, इंग्रजी-मराठी १३२-४०
संदर्भ-टीपा : १४१-९
विषय-सूची, ग्रंथकारनाम-सूची, ग्रंथनाम-सूची १५०-९
विचारात घेतलेले संदर्भ-साहित्य १६०-१

प्रकरण ० मध्ये ऐतिहासिक संचिताचा अभाव (एकनाथांनी 'प्रतिशुद्ध' केलेली ज्ञानेश्वरी समोर आहे, पण ती कोणत्या पद्धतीने केली, हे ठाऊक नाही, ठाऊक





अनुक्रमणिका

होण्याचा मार्गही आज दिसत नाही ), अर्वाचीन प्रयत्नांचा तोकडेपणा (इंग्रजी-मधल्या एकचतुर्यांश शब्दांनाच मराठी प्रतिशब्द बनवण्याचा तोकडेपणा झालेला दिसतो, वेंकटेशशास्त्री जोशी यांनी संस्कृतज्ञासाठी बनवलेले शब्द मराठीत नेहमीच ग्राह्य वाटतील, असे नाही), आणि संकल्पनाकोशाची जरुरी यांचे प्रतिपादन आहे. प्रकरण १ मध्ये (क) पाठभेद उत्पन्न होण्यामध्ये ग्रंथकर्त्याचा, प्रती बनवणाराचा, आणि ग्रंथप्रसारकाचा काय काय वाटा असतो आणि (ख) भिन्न पाठांमधला मूळ ग्रंथकाराला अभिप्रेत पाठ हुडकून काढताना विविध प्रतींचे तौलनिक परीक्षण व तसेच ग्रंथनिर्मिती आणि ग्रंथाचा भाषिक–सामाजिक परिवेश यांची जाण यांचा कसा उपयोग होतो या दोन अंगांनी विवेचन केले आहे. (जाता जाता 'खरा पाठ, की बरा पाठ' या वादाचा दावतर निरास करू पाहतात.) प्रकरण २ मध्ये (क) संशोधक पाठचिकित्सेला का प्रवृत्त होतो (अर्थ लागत नाही किंवा लागतो, तो शंकास्पद वाटतो) आणि (ख) तो कोणकोणत्या पायऱ्या ओलांडून मूळ ग्रंथाच्या जास्तीत जास्त जवळ जाऊन पोचतो (इतर प्रती मिळाल्या, तर त्यांची बारकाईने तुलना करणे, प्रत बनवताना शिरलेले दोष ओळखणे, अजून उरलेल्या पाठभेदांची ग्रंथाची छाननी ग्रंथामागच्या व ग्रंथाभोवतालच्या घटितांच्या मदतीने करणे, या त्या पायऱ्या.) या दोन प्रश्नांची चर्चा आहे. प्रकरण ३ म्हणजे या पुस्तकाचा गाभाच– त्यात १५३ छेदक असून प्रत्येक छेदकात इंग्रजी संज्ञा, ग्राह्य वाटलेला मराठी प्रतिशब्द, संकल्पनाविवरण, निवडलेल्या प्रतिशब्दांचे समर्थन असा क्रम आहे. छेदकांचा क्रम अकारविल्हे नसून विचारांना अनुसरणारा आहे. मुद्रित ग्रंथांच्या पाठचिकित्सेचा विचार या पुस्तकात फारसा केलेला नाही. हस्त-लिखित ग्रंथाचाच मुख्यत: विचार केलेला आहे.

पुस्तकाची श्री. शांताराम पवार यांनी केलेली मांडणी व मुंबईच्या नावाजलेल्या चर्नीरोडच्या शासकीय मुद्रणालयाची छपाई देखणी आहे. पुस्तकाचा उभट आकार मात्र (२९×१५ सेंटिमीटर) जरा गैरसोयीचा आणि अनाकर्षक वाटतो.

पारिभाषिक संज्ञांची निवड, विशेषत: परभाषेतल्या संज्ञांना प्रतिशब्द निवडणे हे पुष्कळदा वादग्रस्त ठरते. हे वाद तोडण्यासाठी काही मार्गदर्शक सूत्रे सांगता येतात. (मी तशी ती अन्यत्र विचारार्थ मांडली आहेतच – 'परिभाषेची परिभाषा', वैखरी, मुंबई १९८३.) पण यामुळे मतभेद फार तर कमी शिल्लक राहतील, संपणार नाहीत. मराठीत हे सर्वच क्षेत्र दावतरांच्या शब्दांत 'प्रयोगावस्थेत' असल्यामुळे परिभाषा स्थिर झालेली नाही, तोवर ती निर्दोष करायला अधिक वाव आहे, एवढे मात्र खरे. ( भाषासंचालनालयाने नेमलेल्या भाषाविज्ञान परिभाषा उपसमितीने भाषाविज्ञान परिभाषेबरोबर वाङ्मयविद्यापरिभाषाही सिद्ध केलेली आहे. तिच्यात हा विषय आलेला आहे. दोन्ही कोश सरकारकडुन प्रकाशित होतील,

अशी आशा मी बाळगून आहे.) मला जाणवलेल्या त्रुटी आणि 'चिंत्य' स्थळे यांच्यापैकी काहींची नोंद इथे करता येईल. (कंसातील आकडे पृष्ठांचे नसून प्रकरण ३ मधल्या छेदकांचे आहेत.)

Text संहिता (२४) : योग्य शब्द पाठ्य. संहिता व पाठ्य या दोन्ही संज्ञा सुचवण्यामागचे एक धोरण समान आहे – भारतीय परंपरेत या संकल्पनेसाठी, पूर्वीपासून शब्द असलाच, तर नवीन शब्द घडवत बसण्यापेक्षा हा जुना शब्दच बरा. 'संहिता' ही संज्ञा 'पाठ' शब्दाशी संबद्ध आहे. 'पाठ' शब्दाचा एक अर्थ वेदाचे पठन केल्यावर कानांवर जे पडते, ते पदे तोडून पठन केलें, तर होतो तो 'पदपाठ', पदे सांधून पठन केले, तर होतो, तो 'संहितापाठ'. ऋग्वेदाचा संहिता-पाठ याबद्दल संक्षेपाने 'ऋग्वेदसंहिता' असेही म्हणतात. 'पदपाठ' याचा संक्षेपही 'पद' असा होऊ शकतो. 'पद (पाठ)' आणि 'संहिता (पाठ)' यांचे नेमके नाते काय, हे सांगण्यासाठी एक वचन तयार झाले (यास्काचे **निरुक्त** १ : १७, ऋग्वेदाचे प्रातिशाख्य २ : १) ते म्हणजे –

पदप्रकृति:संहिता

(अर्थ : संहितापाठ पदपाठावर आधारलेला आहे.) या वचनाचा 'पदे जोडून बनते, ती संहिता म्हणजे टेक्स्ट' असा चुकीचा अर्थ लावल्यामुळे संहिता शब्दाला हा 'टेक्स्ट' हा नसलेला अर्थ आज चिकटलेला दिसतो. 'टेक्स्ट' या अर्थी भरताचे **नाट्यशास्त्र** आणि अन्यत्र 'पाठ्य' हा शब्द आहे. दुसरे म्हणजे पाठचिकित्सेच्या संदर्भात corpus of texts या पारिभाषिक संज्ञेची गरज लागते. पदे सांधून 'संहितापाठ' तयार होतो. त्या धरतीवर पाठ्यें जोडून होणाऱ्या पाठ्यसमुच्च-याला 'पाठ्यसंहिता' म्हणता येईल. दावतरांच्या सूचीत corpus ही संज्ञा आढळत नाही. संस्कृतमध्ये 'संहिता' शब्दाला हा अर्थदेखील आहे. 'टेक्स्ट' साठी 'संहिता' वापरण्याचा प्रघात चालू ठेवला, तर 'कॉर्पस'साठी नवा शब्द घडवावा लागेल. तरी 'टेक्स्ट' या अर्थी 'पाठ्य' शब्द वापरावा, ही दावतरांनाच नव्हे, तर सर्वांनाच कळकळीची विज्ञापना !

Version पाठांतर (३५), variant reading पाठभेद (६३) पाठभेद म्हणजे पाठांमधला फरक, निरनिराळे पाठ; पाठांतर म्हणजे अन्य पाठ; पाठांतरे म्हणजे निरनिराळे पाठ. दोन्ही शब्दांत फारसा फरक नाही. जेव्हा वेगवेगळ्या प्रतींमध्ये पाठभेद खूपच होतात, तेंव्हा ती एकाच पाठ्याची वेगवेगळी रूपेच वाटू लागतात, तेंव्हा 'व्हर्झन' या संज्ञेची गरज भासते. तिला 'ग्रंथरूप' किंवा 'पाठ्यरूप' ही संज्ञा ठीक राहील; एका ग्रंथाची वेगवेगळी पाठ्ये होतात, असे सुचवायचे असेल, तर पाठ्यभेद म्हणावे. 'व्हेरियंट रीडिंग'साठी 'पाठभेद' आहेच. 'पाठांतर' शब्द मराठीतल्या रूढ अर्थापुरताच ('मेमरायझिंग') ठेवावा, पारिभाषिक वापरात तो

'पाठभेद' शब्दाचाच पर्याय ठरेल.

Colophon पुष्पिका (४४). 'कॉलोफॉन'साठी ग्रंथसमाप्ती सुचवणारे शब्द टाळावे, हे सांगताना दावतर म्हणतात, "आधुनिक काळात ... लेखकाबरोबर संपादक, मुद्रक, प्रकाशक, सजावटकार, इत्यादींची माहिती देण्याची प्रथा पडली आहे. हो मजकूर सामान्यत: मुद्रित पुस्तकाच्या आरंभीच्या पानावर येतो. या मजकुराची गणनाही colophon मध्ये केली जाते." आधारासाठी पृ. १४५ वरील टीप ४१ मध्ये इंग्रजी कोशातली जी व्याख्या देतात, तिच्यात मात्र "at end of old books or manuscripts" असे स्पष्टच म्हटले आहे. आधुनिक पुस्तकात कधीकधी शेवटी पुस्तकात वापरलेला टाइप, कागद, इत्यादींची माहिती देतात. त्यालाच 'कॉलोफॉन' म्हणतात. सुरवातीच्या मजकुराला preliminary matter, front-matter असे दुसरे शब्द आहेत; eolophon शब्द त्यासाठी वापरत नाहीत. तेव्हा 'कॉलोफॉन'साठी 'पुष्पिका' शब्दापेक्षा वेंकटेशशास्त्री जोशी यांनी सुचवलेला 'इतिकथन' हा शब्द अधिक अन्वर्थक वाटतो.

Conjecture अंत:स्फुरण (११७), divinatio/divination अंत:स्फूर्त अनुमान (११८). या "दोहोंतील सीमारेषा ... सुस्पष्टपणे दाखवणे ... काहीसे कठीण जाईल" अशी कबुली दावतर देतात. खरी गोष्ट अशी आहे 'डिव्हिनेशन' शब्दाला 'शकुन सांगणे' हा अर्थ चिकटल्यामुळे 'कंजेक्चर' हा पर्यायी शब्द वापरला जाऊ लागला. तेव्हा नसलेली सीमारेषा कशी दाखवणार ? दुसरे म्हणजे 'अंत:-स्फुरण' हा शब्द दिशाभूल करणारा आहे. स्वत: दावतरच प्रा. म. वा. धोंडांचा प्रतिवाद करताना अन्यत्र (पृ. २०) म्हणतात, की धोंड म्हणतात, त्याप्रमाणे "ज्ञानयोग्यासारखी सरळ मूळ पाठाकडे झेप घेणारी" ही पद्धती नाही – तर केवळ पाठभेदांच्या तुलनेपलीकडे जाऊन त्या कृतीचा कर्ता, तिचे मूळ, तिचा उत्तरकालीन इतिहास, अर्थनिश्चय, इत्यादी गोष्टींच्या समग्र आकलनावर आधारलेले अनुमान तारतम्य वापरून काढणारी ती पद्धती आहे. दावतरांचे हे विवेचन योग्यच आहे, पण 'अंत:स्फुरण' हा शब्द मात्र त्याला न्याय देणारा नाही, तो धोंडाच्या अवतरणातला अर्थ सुचवणारा, आणि म्हणून दिशाभूल करणारा आहे. वास्तविक कुलमूलपद्धती genealogical method ही दुसरी पद्धतीही अगदी गणिती प्रकारची आहे, अशातला भाग नाही. अनुमानामध्ये निश्चितपणा कमीजास्त असतो, इतकेच. 'कंजेक्चरल'साठी 'युक्तिसंभाव्य' संज्ञा ठीक होईल, 'कंजेक्चर'साठी 'संभाव्य अनुमान' वापरता येईल. अनुमान अधिक पक्कें असले, तर 'युक्तिग्राह्य' म्हणता येईल.

Hapax legomenon अनन्यार्थबोधक शब्द / एकदा अर्थप्रदानी शब्द (१४६) संदर्भानुसार वापरावयाचे हे पर्याय आहेत. यांपैकी 'विशिष्ट कृतीत किंवा पाठच-

संहितेमध्ये, कॉर्पसमध्ये एकदाच वापरला गेलेला शब्द ' एवढाच म्हणजे क्रमांक दोनचा अर्थ या संज्ञेला आहे. क्रमांक एकचा अर्थ ( ' कायम एकाच अर्थाने वापरला गेलेला शब्द ' ) या संज्ञेसाठी दावतरांनी कुठून शोधून काडला, तें समजत नाही. दुसऱ्या क्रमांकाचा अर्थच योग्य आहे, त्यासाठी ' सकृत्–प्रयुक्त शब्द ' किंवा ' अनावृत्त शब्द ' असा काही पर्याय ' एकदा अर्थप्रदानी शब्द ' पेक्षा अधिक बरा वाटावा.

अर्थात अशा त्रुटींमुळे किंवा मतभेददर्शनामुळे या पुस्तकाचे महत्त्व कमी होत नाही. वाङ्मयविद्या (philology) या ज्ञानशाखेचे जे ग्रंथावर लक्ष केंद्रित करून त्याच्यावर प्रकाश टाकणारे ग्रंथानुग्रामी अंग आहे, त्याच्या पाच शाखा आहेत–

(१) पाठचिकित्सा lower criticism
( दावतर याला संहितासमीक्षा म्हणतात )
(२) पाठलक्षी टीका annotation
(३) सांख्यिकीय परीक्षण statistical study
(४) ग्रंथनिर्मितीची चिकित्सा higher criticism, study of text genesis
(५) ग्रंथसंक्रमण व ग्रंथप्रसृती यांची चिकित्सा study of transmission and dissemination of a text

यांपैकी क्रमांक १, २, ४ च्या शाखांना उद्देशून, विशेषत: क्रमांक १ च्या शाखेला उद्देशून ' टेक्स्चुअल क्रिटिसिझम ' हा शब्द लावला जातो. मराठीमध्ये या पद्धतींची व्हावी तशी सैद्धांतिक चिकित्सा झालेली नाही, हे कटुसत्य आहे. त्यामुळे प्रत्यक्ष ग्रंथांचा जो अभ्यास होतो, तोही नीट होत नाही, आणि या पद्धती नीटपणे शिकवल्या जात नाहीत. अशा स्थितीत दावतरांनी हे पुस्तक लिहून मोठीच कामगिरी बजावलेली आहे. ' प्रायोगिक अवस्थे ' मधून बाहेर पडण्यासाठी टाकलेले पहिले पाऊल म्हणून त्याच्याकडे पाहायला हवे. या पुस्तकात कमतरता आहे, ती भरपूर उदाहरणांची. ती कमतरता भरून काढणारे दुसरे पाऊल टाकणारा कुणी निघणार का ?

अशा संकल्पना–कोशाच्या एका जुन्या नमुन्याकडे या निमित्ताने मला विशेष लक्ष वेधावेसे वाटते.

सखाराम विनायक आपटे, ' सभाकार्यविषयक परिभाषा ', **महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका** एप्रिल १९४२. पुनर्मुद्रण : म. वि. आपटे, मा. पु. जोशी (संपादक); **शास्त्रीय परिभाषा–कोश**, पुणे : महाराष्ट्र–साहित्य परिषद; १९६२.

आपटे, व्होरा आणि पळशीकर, दावतर यांनी वेगवेगळ्या प्रकारे आपापल्या संकल्पना–कोशांची मांडणी केली आहे. (आपट्यांची मांडणी अधिक सरस आहे. व्होरा–पळशीकरांची संज्ञांची निवड अधिक सरस आहे, दावतरांनी केलेला पर्यायी

संज्ञांचा ऊहापोह अधिक सरस आहे, 'ऊहापोह' म्हणजे conjecture आणि refutation ! ) असे विविध ज्ञानक्षेत्रांसाठी अजून कोश निघायला पाहिजेत—या तिघांचे गुण एकवटून.

**कानी पडलेला संवाद**

स्थळ : नेपाळच्या सीमेवरील तराई प्रदेशातील एक विहारचे गाव.

पात्रे : एक पत्रकार महिला मूळची त्याच भागातली आणि एक पंचविशीतला चार मुलांचा बाप आणि त्याचा म्हातारा बाप असे दोघे खेडूत. ती त्या तरुणाला विचारत आहे.

'तुम्हाला बिकाऊ नावानं का पुकारतात ?' (बिकाऊ म्हणजे विकाऊ.)

'माझ्या बापानी माझं नाव मोती ठेवलंवतं', तो पडक्या चेहऱ्यानं सांगतो. 'पण वरच्या जातीच्या आणि माल्दार लोकांनी त्याला ठोकून काढलं अन् म्हटलं, अरे चमारा, मुलाचं नाव मोती ठेवायची मजाल ! मोती म्हणे ! तो तर तुझ्यासारखा झाडलोटीचं काम करणार एक दिवस. कुणीही त्याला विकत घ्यावं—द्यावं. तेव्हापासून मला बिकाऊच म्हणतात.'

'पंचायतराज विधेयकाबद्दल तुम्हाला काय वाटतं, बिकाऊ ?'

'कुठलं विधेयक ?'

'लोकांच्या हाती सत्ता देणारं विधेयक.'

'कुठले लोक ?'

'पंचायतीचे लोक, पंचांच्या हाती.'

'पण ते तर लोक कुठले ? पंच मायबाप.'

मग ती बिकाऊच्या बापाचं मत विचारते.

'माझ्या म्हातारपणच्या पेन्शनबद्दल काही करा ना', तो प्रश्न ऐकला न ऐकलासं करून म्हणतो. 'दोन वर्षं झाली मी मिश्रजी मुखियांना भेटून सांगितलं. त्यांनी मागणी केली.' (मुखिया म्हणजे पाटील, त्याला म्हणायचंय सरपंच.) तो पुढं बोलतो, 'मग मी माझा लोटा-थाळी अडतीस रुपयाला विकली अन त्यांना आलेले पैसे दिले. पेन्शनची अजून पत्ताच नाही. पण मला आता पत्रावळीवर जेवायला लागते.'

**नलिनी सिंह, 'ए बिल् टु किल्', इंडियन एक्स्प्रेस १९८९-०६-१८**

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्या-तरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 040048/83

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

### ललितकलाविषयक प्रकाशने

| | प्रकाशनाचे नाव | लेखक | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १. | लय–ताल–विचार | डॉ. श. वि. गोखले | ८० |
| २. | तंजावूर नृत्य प्रबंध | श्री. पार्वतीकुमार | १६५ |
| ३. | माझा संगीत व्यासंग | श्री. गोविंदराव टेंबे | २८ |
| ४. | संगीत–दर्पण | श्री. गोविंदराव टेंबे | १५ |
| ५. | संगीत रत्नाकर भाग १ | प्रा. ग. ह. तारळेकर | २९ |
| ६. | संगीत रत्नाकर भाग २ | प्रा. ग. ह. तारळेकर | ३० |
| ७. | नाट्यमंडप [भरतमुनिप्रणीत नाट्यमंडपमूचा अनुवाद] | डॉ. र. पु. कुलकर्णी | १५ |
| ८. | काश्यपशिल्प [" काश्यपशिल्पम् " या संस्कृत ग्रंथाचा अनुवाद] | डॉ. र. पु. कुलकर्णी | ६० |
| ९. | Life & Still Life [ केकी मूस यांच्या छायाचित्रांचा संग्रह ] | ...... | १०० व १२५ |
| १०. | प्रकाशचित्रण : एक कलामाध्यम | श्री. के. बा. गोडबोले | २१० |
| ११. | शंकर पळशीकर [चित्रसंग्रह] | ...... | ९० |
| १२. | चित्रचिरंतन [श्री शुभराय महाराज यांच्या चित्रांचा संग्रह ] | ...... | ४० |

**साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने खालील केन्द्रांवर मिळतील :**

१. प्रकाशन व्यवस्थापक, शासन मुद्रण व लेखन सामग्री विभाग चर्नी रोड, मुंबई ४०० ००४

२. व्यवस्थापक, शासन लेखन सामग्री आणि ग्रंथागार, शहागंज, गांधी चौक, औरंगाबाद ४३१ ००१

३. व्यवस्थापक, शासकीय ग्रंथागार, बडवे बिल्डिंग, पी. वाय्. सी. जिमखाना, पुणे ४११ ००४

४. व्यवस्थापक, शासन मुद्रण व ग्रंथागार, सिव्हिल लाईन्स, नागपूर ४४० ००१